रविकिरणमंडळाचें ३९ वें पुस्तक

# पाणपोई

निवडक कवितांचा संग्रह

कवि

यशवन्त

प्रस्तावना

वि. स. खांडेकर

1951

किंमत तीन रुपये

# निवेदन

बरेच दिवस मनांत घोळत असलेली कल्पना ह्या कवितासंग्रहाच्या प्रकाशनानें मूर्त रूपास येत आहे. ह्या कल्पनेला चालना कांहीं सुहृदांनीं दिली. कवितांची निवड करतांना रसिकांची आवड आणि स्नेहीजनांच्या सूचना ह्यांचाहि फार उपयोग झाला. प्रस्तुत संग्रहांत आणखीहि कांहीं कविता समाविष्ट व्हायला पाहिजे होत्या असें रसिकांना वाटेल. पण कालमानादि विचारांच्या मर्यादा पडणें अपरिहार्य होतें.

कविता कोणत्या अनुक्रमानें छापाव्यात असा एक प्रश्न होता. रंगरूपाकडे लक्ष देऊन त्यांचे निरनिराळे गट करणें सोयीवार वाटलें. अर्थात् गट स्थूलपणेंच करण्यांत आले आहेत. कांहीं कवितांचें स्वरूप संमिश्र असल्यामुळें त्यांच्या वर्गवारीबद्दल मतभेद होण्याचा संभव आहे. पण रंगरूपापेक्षां कवितेच्या प्रकृतीवरच विशेष भर दिलेला आढळेल.

श्री. वि. स. खांडेकर यांची प्रस्तावना हें मला ह्या संग्रहाचें भूषण वाटतें. पूर्वी प्रा. श्री. बा. रानडे यांनीं माझ्या दोन कविता–संग्रहांचा पुरस्कार केला होता. कवि गिरीश यांचें 'बन्दीशाळा' ह्या खंडकाव्याला रसग्रहण लाभलें होतें. श्री. खांडेकर यांच्या प्रस्तावनेची जोड ह्या कवितासंग्रहाला मिळाल्यानें, माझी बरेच दिवसांची एक मनीषा पूर्ण होत आहे.

बाकी सर्व सिद्धता व सजावट करण्याचे परिश्रम प्रकाशक श्री. कुलकर्णी यांचे आहेत. शक्य तों अलीकडील छायाचित्राचा अंतर्भाव ह्या कवितासंग्रहांत करावा ह्या त्यांच्या कल्पनेला, जळगांव येथील श्यामेंदू स्टुडिओचे मालक श्री. डी. जी. चौधरी ह्यांनीं हौसेनें घेतलेल्या छायाचित्रानें मूर्त रूप आलें. श्री. चौधरी ह्यांचे आभार मानणें हें आमचें गोड कर्तव्यच आहे.

पुणें २
३–१२–१९५१

—यशवन्त

# कवि यशवन्त यांची साहित्य–सम्पदा

## पद्य

**मित्र-प्रेम-रहस्य**
मित्रनिधनावरील विलापिका ४ आणे

**तुटलेला तारा**
लो. टिळक यांच्या निधनावरील शोकगीत

**यशवन्ती**
प्राथमिक स्फुट कवितासंग्रह. १० आणे

**यशोधन**
'इंदुकला' आणि इतर कवितांचा संग्रह [ चौथी आवृत्ति ] २ रु.

**भावमंथन**
एक सुनीतमाला व कांहीं भावगीतें ८ आणे

**बन्दीशाळा**
बाळगुन्हेगारांच्या करुण स्थितीवरील खंडकाव्य [ दुसरी आवृत्ति ] २ रु.

**जयमंगला**
विविध भावगीतात्मक हृदयंगम प्रेम-कथा [ दुसरी आवृत्ति ] १॥ रु.

**यशोगंध**
यशोधनानंतरचा सरस व भावमधुर कवितासंग्रह १॥ रु.

**यशोनिधि**
यशोधन व यशोगंध यांचें तुल्यगुणी भावण्ड. १॥ रु.

**यशोगिरी**
धन-गंध-निधीचें विकासशील व अनुभव-समृद्ध स्वरूप १॥ रु.

**काव्यकिरीट**
राज्यारोहणविषयक खण्डकाव्य १॥ रु.

**ओजस्विनी**
ओजस्वी कवितांचा संग्रह १॥ रु.

## गद्य

**प्रापंचिक पत्रें**
संसाराच्या वास्तवतेचें रम्योत्कट चित्रण ३ रु.

**घायाळ**
हृदयस्पर्शी कादंबरी २ रु.

**कांतणीचें घर**
लघुनिबंध-संग्रह २ रु.

## बालवाङ्मय

**मोतीबाग**
बालगाण्यांचा एकमेव वैभवशाली संग्रह १० आणे

**दरोडेखोर ? छे, देवदूत !**
शिक्षण-तज्ज्ञांनीं प्रशंसिलेल्या दोन मनोरंजक गोष्टी ६ आणे

**भगवी गीता**
दोन उद्बोधक गोष्टी. ५ आणे

**चाणाक्ष न्यायाधीश**
अनुवादित प्रहसन ४ आणे

# प्रास्ताविक

अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत १९२० हें मोठें महत्त्वाचें वर्ष आहे. चिपळूणकरांच्या निबंधमालेपासून साहित्याच्या विविध क्षेत्रांत जीं जीं वैचारिक आणि कलात्मक आंदोलनें सुरू झालीं, त्यांचें त्यांचें अवतारकार्य या अर्धशतकांत पूर्ण होत आलें असें म्हणायला हरकत नाहीं. या चार तपांच्या अवधींत मराठी शब्दसृष्टीचे ईश्वर ज्या प्रवृत्तींनीं प्रस्फूर्त झाले होते, ज्या भावनांनीं भारावून गेले होते, आपल्या मनाच्या क्षितिजावर ज्या नवनव्या कल्पना पाहत होते, त्या सर्व या वेळीं थोड्याफार मागें पडूं लागल्या होत्या. शांत जलाशयांत लहानसा खडा टाकला तरी तो अनेक तरंग निर्माण करतो. त्या तरंगांचीं वलयें प्रथम विस्तारत जातात आणि मग अस्पष्ट होत होत विलय पावतात. इंग्रजी सत्तेशीं संघर्ष आणि इंग्रजी वाङ्मयाशीं संबंध आल्यावर निर्माण झालेल्या आपल्यांतील सर्व आंदोलनांची अशीच स्थिति झाली. यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. इतिहासाचा तो क्रमच आहे. काळपुरुष जणूं कांहीं एक रहाटगाडगें चालवीत असलेला असतो ! त्या रहाट-गाडग्यांच्या पोहऱ्यांप्रमाणें सामाजिक जीवन पिढीपिढीला खालींवर होत असतें, बदलत जातें. तें जीर्ण कल्पनांकडे पाठ फिरवून त्यांचा त्याग करतें, नव्यांना पोटाशीं कवटाळून धरतें. भौतिक, आर्थिक आणि सामाजिक जीवन जसजसें बदलतें तसतसा मानवी इच्छा, आशा, आकांक्षा आणि ध्येयें यांच्यांत फरक पडतो. अर्थात् या सर्वांची कलापूर्ण अभिव्यक्ति करणारें जें वाङ्मय तेंहि निराळें स्वरूप धारण करूं लागतें. चिपळूणकर–आगरकरांनीं लेखणी हातांत घेतली तेव्हां नेमकें हेंच घडलें होतें. १९२० च्या आसपास त्याचीच

पुनरावृत्ति झाली. मात्र तेवढ्या मोठ्या प्रमाणांत नव्हे ! तथापि १९२० ला झालेला बदल सूक्ष्म, पुसट, किंवा वाङ्मयाच्या इतिहासकारानें दुर्लक्ष करण्याइतका सामान्य नाहीं

१९२० च्या आगेमागेंच वाङ्मयक्षेत्रांतलीं अनेक मातबर माणसें कालवश झालीं. मराठी कादंबरीला संजीवनीमंत्र देणारे कादंबरीकार हरिभाऊ आपटे, आपल्या प्रतिभेच्या विलासानें एका दशकांत महाराष्ट्र जिंकणारे कवि व नाटककार गडकरी, फुलामुलांचे कवि टिळक आणि सृष्टीचे भाट बालकवि— हे सारे प्रतिभासंपन्न साहित्यिक १९१८–१९ मध्यें दिवंगत झाले. त्यांनीं ज्या जीवनांतून आणि वाङ्मयांतून स्फूर्ति घेतली होती तें याच वेळीं थोडेंफार मार्गे पडूं लागलें. ज्या तीव्र सामाजिक अनुभूतींतून हरिभाऊ आणि गडकरी यांचें लेखन सजीव झालें, ती दोन पिढ्यांमध्यें हळुहळू होत आलेल्या आर्थिक व सांस्कृतिक बदलांमुळें नव्या काळाशीं पूर्वीइतकी जुळती राहणें शक्य नव्हतें. उदाहरण म्हणून एकाच गोष्टीचा उल्लेख इथें करतों. ज्या वेळीं हरिभाऊ आपटे आपली ' कर्मयोग ' ही शेवटची कादंबरी ' करमणुकीं 'त लिहीत होते, त्याच वेळीं वामनराव जोश्यांची पहिली कादंबरी ' रागिणी ' मासिक 'मनोरंजनां'तून प्रसिद्ध होत होती. वामनरावांच्या कादंबरींत हरिभाऊंचे अनेक गुण नाहींत. पण ' कर्मयोग ' मधील ' नर्मदा ', ' पण लक्षांत कोण घेतो ?' मधल्या ' यमू ' इतकीच सजीव व हृदयस्पर्शी असली तरी ती १९१५ च्या मध्यम वर्गातल्या स्त्रीजीवनाचें प्रतिनिधित्व करूं शकत नाहीं. उलट रागिणी आणि उत्तरा यांच्या चित्रणांत कला कमी असली तरी मध्यम वर्गातल्या स्त्रीमनांत आणि स्त्रीजीवनांत जे बदल घडून येत होते ते त्यांच्या द्वारें वामनरावांनीं स्पष्टपणें सूचित केले आहेत. त्यामुळेंच तत्कालीन वाचकांच्या मनाची पकड ' रागिणी'नें घेतली.

१९२० हें वाङ्मयदृष्ट्या मोठ्या संक्रमणाचें वर्ष ठरलें, याला केवळ ही एकच गोष्ट कारणीभूत झाली असें नाहीं. एकीकडे पूर्णचंद्राचा अस्त तर दुसरीकडे बालसूर्याचा उदय हें दृश्य सर्व क्षेत्रांत प्रत्येक पिढीला दिसतच

असतें ! भारतीय जीवनावर चिरकालीन परिणाम घडवून आणणाऱ्या दुसऱ्या अनेक गोष्टीहि १९१० ते १९२० या दशकांत घडल्या. पाहिली १९१४ ते १९१८ पर्यंत चाललेलें महायुद्ध ! या पहिल्या महायुद्धाची झळ आपल्या देशाला प्रत्यक्ष फारशी लागली नाहीं. पण विज्ञानाच्या साहाय्यानें जवळ येऊं लागलेलीं माणसें मनानेंहि तितकींच जवळ येतील आणि या विसाव्या शतकांत पृथ्वीला स्वर्गाचें रूप आणतील इत्यादि एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस रूढ होऊं लागलेल्या कल्पना किती निराधार आहेत हें या युद्धानें स्पष्टपणें दर्शविलें. तें महायुद्ध सुरू असतांनाच रशियांत राज्यक्रांति झाली. या क्रांतीचें स्वरूप एक राजा जाऊन दुसरा त्याच्या जागीं येणें अथवा एक सत्ता नाहींशी होऊन तिथें दुसरीचें राज्य सुरू होणें असें जुन्या प्रकारचें–केवळ राजकीय–नव्हतें. त्या क्रांतीचीं मुळें आर्थिक व सामाजिक विषमतेंत—त्या विषमतेचें निर्मूलन करूं इच्छिणारांनीं निश्चित केलेल्या एका नव्या विचारप्रणालींत–होतीं. या क्रांतीमुळें समतेला सक्रिय आवाहन करणाऱ्या एका नवीन समाजरचनेचा प्रयोग रशियांत सुरू झाला. साहजिकच सामाजिक सुधारणेचा परंपरागत चालत आलेला पूर्वीचा संकुचित अर्थ बदलण्याची पाळी जगांतल्या प्रत्येक देशावर आली.

देशाबाहेरल्या या घडामोडीप्रमाणें देशांतल्या अनेक घटनाहि १९२० नंतरचा आपल्या जीवनाचा व वाङ्मयाचा ओघ बदलविण्याला कारणीभूत झाल्या. इंग्रजी पारतंत्र्याशीं निधड्या छातीनें टक्कर घेणारे लो. टिळक १९२० सालींच दिवंगत झाले. दक्षिण आफ्रिकेंत आणि चंपारण्यांत सत्याग्रहानें अन्यायाचा प्रतिकार करूं पाहणारे गांधीजी याच वर्षी भारताचे नेते बनले. त्यांच्या असहकारितेच्या चळवळीमुळें भारतीय राजकारणांत अनेक नवे प्रयोग सुरू झाले. त्यांचें राजकारण हें केवळ राजकारण नव्हतें. तें समाजकारण, अर्थकारण, धर्मकारण सर्व कांहीं होतें. गांधींनीं समाजांतल्या अनेक सुप्त सात्त्विक शक्ति जागृत केल्या. नवीन आंदोलनें, नवीन कार्यक्रम, नवीन कल्पना यांचा आश्रय करून त्यांनीं समाजमन अंकित केलें.

आमचे वाङ्मयीन आदर्शहि याच वेळीं बदलले. संस्कृत व इंग्रजी साहित्यांत सारखीच मुरलेली पिढी मागें पडली. इंग्रजी साहित्याशीं व इंग्रजीच्या द्वारें अन्य युरोपियन साहित्याशीं अधिक परिचित होत असलेली पिढी साहित्य-क्षेत्रांत उदयाला आली. शेक्सपीयर-मोलियरऐवजीं शॉ–इब्सेनचा अभ्यास करणारे, स्कॉट–डिकेन्सच्या जागीं हार्डी–टॉलस्टॉय यांचे संदर्भ देणारे, कथा म्हणजे छोटी कादंबरी असें न मानतां चेकॉव्ह-मोपासाँच्या पावलावर पाऊल टाकणारे लेखक मराठी वाङ्मयांत वावरूं लागले. १९२० नंतरच्या पांचदहा वर्षांत निबंध, कथा, कादंबरी, नाटक इत्यादि सर्व प्रमुख वाङ्मयक्षेत्रांचें स्वरूप एकदम मोठ्या प्रमाणांत पालटलेलें दिसतें याचें प्रमुख कारण हें आहे. काव्यक्षेत्रहि कांहीं याला अपवाद नव्हतें.

• •

१९२०–३० च्या दशकांत कवि म्हणून अनेक बुद्धिमान् मंडळी पुढें आली. केशवकुमार, काव्यविहारी, विरकूड, ह. स. गोखले, अज्ञातवासी, सोपानदेव चौधरी, वगैरे पुष्कळ कवींनीं या दशकांत वाचनीय कविता लिहिली. गिरीश, माधव ज्यूलियन, यशवंत प्रभृति कवींनीं तर रविकिरण–मंडळाची स्थापना करून त्या काळांतल्या काव्याच्या प्रगतीला फार मोठा हातभार लावला. एका संस्कृत कवीनें पंडितांची वनितांशीं तुलना केली आहे. दोघांनाहि आश्रयाची आवश्यकता असते असें त्याचें म्हणणें. पण ही तुलना दुसऱ्याहि एका दृष्टीनें खरी आहे, असें लोकांना नेहमीं वाटे. दोन बायकांप्रमाणें दोन साहित्यिकांचेंहि सहसा पटत नाहीं असा व्यवहारांत अनुभव येतो. पण रविकिरण–मंडळानें त्या अनुभवाला अपवाद असतात हें सिद्ध करून दाखविलें. या काळांतली अनेकांची काव्यसेवा उल्लेखनीय असली तरी दीर्घकाळानेंहि रसिकांचें मन आकृष्ट करण्याचें सामर्थ्य अंगीं असलेली कविता फक्त तीनच कवींनीं लिहिली. तांबे (तांब्यांची कविता या संग्रहाच्या उत्तरार्धांतलीं सर्व कवनें १९२० ते १९३५ या काळांतच लिहिलीं गेलीं), माधव ज्यूलियन आणि यशवंत.

• •

१९१९–१९२० च्या सुमारालाच यशवंतांची पहिली कविता प्रसिद्ध झाली. मासिक मनोरंजन व नवयुग हीं त्या वेळचीं श्रेष्ठ ललित मासिकें

होतीं. नवयुगांत ‘ तारकानाथ ’ या नांवानें यशवंतांची एक कविता या सुमारासच प्रसिद्ध झाल्याचें मला आठवतें. पण लवकरच त्यांनीं या टोपण-नांवाला रजा दिली. १९२१ सालीं नरसिंह चिंतामण केळकर यांच्या अध्यक्षते-खालीं बडोदें येथें भरलेल्या साहित्य-संमेलनांत यशवंत कवि म्हणून लोकां-पुढें आले व गाजले. ‘ स्वातंत्र्यलक्ष्मीस मुजरा, ’ ‘ देहाचा पूल ’ इत्यादि कविता त्यांच्या भरदार आणि भावपूर्ण वाणींतून ऐकतांना टिळक, बालकवि, गोविंदाग्रज वगैरे जुने तारे निखळून पडल्यामुळें निस्तेज झालेल्या काव्याच्या आकाशांत एक नवा तेजस्वी तारा उदय पावत आहे अशी रसिकांची खात्री झाली.

त्या वेळच्या यशवंतांच्या कवितांकडे वळून पाहिलें म्हणजे कवि-प्रतिभा, कवीचें व्यक्तिजीवन, आणि कवीच्या भोंवतालची सामाजिक व वाङ्मयीन परिस्थिति यांचे परस्परांवर कसे परिणाम होतात याची चांगली कल्पना येते व ललित वाङ्मय हें सुद्धां-अंशतः का होईना-एक प्रकारचें रसायन आहे अशी खात्री होते. राजकीय दृष्ट्या तो काळ लोकांच्या स्वातंत्र्यविषयक भावना जागृत करण्याचा होता. ‘ स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे ’ ही लोक-मान्यांची घोषणा त्या वेळीं वातावरणांत दुमदुमत होती. बलाढ्य ब्रिटिश साम्राज्याशीं सामना करण्याकरितां अहिंसावादी गांधीजी रणांगणावर उतरले होते. साहजिकच स्वातंत्र्याचें स्मरण करून देणाऱ्या ऐतिहासिक कथनाविषयीं लोकांना त्या काळीं मोठें प्रेम वाटे. आपल्या ओजस्वी आणि कलाकुशल वाणीनें इतिहास गाणाऱ्या माधवांपासून तों पाल्हाळिक पद्धतीनें ऐतिहासिक प्रसंग वर्णन करणाऱ्या तिवारींपर्यंत विविध प्रकारचे कवि त्या वेळीं ऐतिहासिक कविता लिहीत होते. सातारा जिल्ह्यांतलें चाफळ ही यशवंतांची जन्मभूमि. समर्थांच्या वास्तव्यानें पुनीत झालेला भाग या भूमीभोंवतीं पसरलेला. संस्कारक्षम बाल्वयांत एकीकडून रामदासांचे व दुसरीकडून लोकमान्यांचे खडे बोल त्यांच्या कानांवर सतत पडत राहिलेले. त्यामुळें तेजस्वी ऐतिहासिक कविता लिहिण्याची इच्छा यशवंतांच्या मनांत निर्माण होणें स्वाभाविक होतें. ‘ स्वातंत्र्य-लक्ष्मीस मुजरा ’

या कवितेंत ते स्वतःला दऱ्याखोऱ्यांतला शाहीर म्हणवून घेतात. त्यांत केवळ विनयच नाहीं; औचित्यपूर्ण असा जन्मभूमीविषयींचा अभिमानहि आहे.

त्यांच्या वर उल्लेखिलेल्या दोन कविता व या कवितांच्या पाठोपाठ १९२२ सालीं लिहिली गेलेली 'आई' ही कविता यांची तुलना केली तर तीस वर्षां-नंतर सुद्धां 'आई' चा गोडवा कायम राहिला आहे, पण बाकीच्या दोन तिच्या मानानें फिक्क्या वाटूं लागल्या आहेत असें दिसून येईल. असें होण्याचें मुख्य कारण यशवंतांच्या व्यक्तित्वाचे आणि प्रतिभेचे सर्व विशेष 'आईत' एकवटले आहेत हें होय. ते स्वभावतः आत्मनिष्ठ कवि आहेत. दैनंदिन जीवनांतलीं लहानसहान सुखदुःखें सुद्धां ते विलक्षण उत्कटतेनें अनुभवूं शकतात. त्या अनुभूतींचा रसपूर्ण आविष्कार करण्यांत ते सिद्धहस्त आहेत. त्यांचा पिंड कनिष्ठ मध्यम वर्गाच्या १९२० पूर्वीच्या जीवनमूल्यांनीं संपूर्णतः संस्कारित झालेला आहे. कुटुंबप्रेम व तदनुषंगिक ध्येयवाद हा त्या वर्गाच्या जीवनाचा केंद्रबिंदु होता. धर्म, नीति, देशभक्ति, समाजसेवा यांच्या गुंफणींत सुद्धां तो बिंदु उठून दिसत असे. यशवंतांच्या कौटुंबिक कवितांतील उत्कट आर्द्रता व उदात्त आर्द्रता यांचें मूळ त्यांच्या मनाच्या या घडणींत आहे. या विशिष्ट दृष्टीनें यशवंतांच्या अशा प्रकारच्या कविता व य. गो. जोश्यांच्या कौटुंबिक कथा यांच्यांत असलेलें साम्य अभ्यसनीय आहे.

ऐतिहासिक थाटाच्या कवितांनीं लोकप्रियता मिळविली असूनहि यशवंत त्या प्रकारचें काव्यलेखन करीत राहिले नाहींत. याचें कारण भावगीताला अत्यंत अनुकूल असलेली त्यांच्या मनाची घडण हेंच होय असें मला वाटतें. कलापूर्ण ऐतिहासिक कविता लिहायला पहिल्या प्रतीचे अनेक काव्यगुण अंगीं असावे लागतात हें 'माधवांच्या' कवितेवरून दिसून येईल. पण इतकी चांगली ऐतिहासिक कविता लिहिणारे माधव भावगीतांत रमूं शकले नाहींत ही गोष्ट या संदर्भांत अवश्य लक्षांत घेतली पाहिजे.

या उत्कट आत्मनिष्ठ वृत्तींतूनच यशवंतांची सर्व सरस कविता स्फुरली आहे. मग तिचें स्वरूप ज्यांत भावनेला प्राधान्य आहे असें कौटुंबिक अथवा प्रेमपर

असो किंवा ज्यांत विचाराला आवाहन आहे असें सामाजिक किंवा टीकात्मक असो. 'दैवतें मायतात' (पृ. १३), 'तूंच रमणी' (पृ. ४८), जगरहाटी (पृ. २१), 'क्षुद्र जीवजन्तूस' (पृ. ५३) या कविता तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्या म्हणजे हें सहज ध्यानांत येतें.

• •

मात्र यशवंतांची प्रकृति भावकवीची असली तरी रामदासांच्या पदरजानें पुनीत झालेल्या प्रदेशांत बाळपण गेल्यामुळें आणि कनिष्ठ मध्यमवर्गाच्या उच्च जीवनमूल्यांचे सुसंस्कार व्यक्तित्वावर झाल्यामुळें त्यांच्या जीवनांत व त्यामुळेंच त्यांच्या काव्यांत एक प्रकारचा झुंजारपणा आला आहे. रामदासांच्या सरळ, सावेश, रोखठोक बोलांचा आणि सामान्य माणसांतल्या वीरत्वाला आवाहन देणाऱ्या वाणीचा प्रभाव त्यांच्यावर निःसंशय पडला आहे. यशवंतांच्या काव्यांत निराशेचाच सूर अधिक असतो, ते नेहमीं जीवनांतलीं रडगाणींच गातात, अशा प्रकारचा आक्षेप गेल्या दोन तपांत त्यांच्यावर अनेकदां घेण्यांत आला आहे. अगदीं अलीकडे प्रो. जोग यांनीं 'जीवनाविषयींची यशवंतांची दृष्टि एक प्रकारच्या स्थिर नैराश्याची' आहे असे उद्गार काढले आहेत. (अर्वाचीन मराठी काव्य, पृ. २०६) इंग्रजी वाङ्मयांत हार्डीविषयीं असेंच म्हटलें जातें. पण हार्डी जीवनाचें जें चित्रण करतो त्यांत निष्ठुर नियतीला प्राधान्य असतें. त्या अंध आणि क्रूर देवतेच्या वेगानें धावणाऱ्या रथाखालीं चिरडून जाण्याकरितांच मनुष्य जन्माला येतो असा हार्डीचें वाङ्मय वाचून आपला ग्रह होतो. यशवंत त्याच्यासारखे नियतिवादी—व म्हणूनच कट्टर निराशावादी किंवा अश्रद्धावादी—नाहींत. मानवी आयुष्य—सर्व सामान्य मनुष्याचें आजचें, आपल्या देशांतलें, आपल्या समाजांतलें जीवन ही सुखांतिका नाहीं हें ते स्पष्टपणानें आणि वारंवार सांगतात. पण जीवनांतल्या या दुःखाला दैवापेक्षां माणूसच अधिक जबाबदार आहे, असें त्यांना वाटतें. 'गुलामाचें गाऱ्हाणें (पृ. २०), 'जगरहाटी' (पृ. २१), 'लिलाव' (पृ. २५) 'व युगंधरांचें पालुपद' (पृ. ३५) या कवितांचे विषय अतिशय भिन्न असले तरी त्या सर्वांतून कवीचा हा दृष्टिकोन चांगल्या रीतीनें प्रकट झाला आहे.

शिवाय टीकाकार समजतात तितका निराशावाद हा कांहीं कलावंतांचा अवगुण होऊं शकत नाहीं. डॉक्टराप्रमाणें ललित लेखकानें नेहमीं आशावादाचाच आश्रय करावा अशी ज्यांची कल्पना असेल त्यांना जीवनाची काय किंवा वाङ्मयाची काय खोली आणि उंची कळलीच नाहीं असें म्हणावें लागेल. जातिवंत कलावंत आपल्या कलेंत जें जग चित्रित करतो तें त्याच्या वैयक्तिक अनुभूतींतून निर्माण झालेलें असतें. तें एका बाजूनें खऱ्या जगाशीं संलग्न झालेलें दिसतें, तर दुसरीकडून अनुभव, कल्पना आणि विचार यांच्या संमिश्रणांतून निर्माण होणाऱ्या सर्वस्वी निराळ्या अशा त्याच्या मनःसृष्टींतल्या वैयक्तिक जगाशीं तें संबद्ध झालेलें असतें. 'अशी असावी कविता फिरुन ! तशी नसावी कविता म्हणून ! सांगायया कोण तुम्ही कवीला ! आहांत मोठे पुसतों तुम्हांला ?' हा केशवसुतांचा प्रश्न सकृद्दर्शनीं उद्धटपणाचा वाटला तरी तो कलाविषयक चिरंतन मूल्यांच्या जाणिवेंतूनच निर्माण झाला आहे. काव्याला काय किंवा इतर ललित वाङ्मयाला काय, वावडें आहे तें खोटेपणाचें, कृत्रिमतेचें, तकलुपी कारागिरीचें, निर्जीव अनुभूतीचें, एखादें तत्त्वज्ञान केवळ लोकप्रिय आहे म्हणून त्याची री ओढण्याचें. यशवंतांच्या काव्यांतल्या नैराश्याच्या छटा उत्कट आहेत, सजीव आहेत, जखमेंतून स्रवणाऱ्या रक्तबिंदूसारख्या आहेत. वैयक्तिक अनुभूतीला सर्वस्पर्शी स्वरूप देण्याच्या सामर्थ्यामुळें त्या केवळ कारुण्य उत्पन्न करीत नाहींत. 'गुलामाचें गाऱ्हाणें' (पृ.२०)सारखी

'धांवूं किती रे मालका ! होसी दयेला पारखा !
किंवा तुझी इच्छाच का—! जावें फुटोनी म्यां उरीं ?'

या ओळींनीं संपणारी कविता पाहिली तरी तिच्यांतलें दुःख हें साऱ्या दरिद्री श्रमिकांचें दुःख आहे याची जाणीव वाचकाला तत्काळ होते.

'त्या बक्षिसाच्या पोतड्या । हांसून मोतद्दार घे ॥
माझ्या तनूच्या चिंधड्या । कोणीहि पाहे ना परी ॥'

या ओळींतून व्यक्त होणारें दुःख मानेवर खडा ठेवून जन्मभर खर्डेघाशी करणाऱ्या कारकुनाचें आहे, शेतात मरमर राबून दरिद्री राहणाऱ्या शेतकऱ्याचें

आहे, यंत्रांच्या घरघरींत अहोरात्र जीवन कंठून यंत्र बनणाऱ्या मजुराचें आहे, पोट बांधून पुढल्या पिढीचा शिल्पकार होणाऱ्या शिक्षकाचें आहे. किंबहुना परिस्थितीचा तीव्र विषमता आणि वैभवाच्या स्थानीं असलेल्या माणसांच्या आत्म्याची बधिरता यांच्या कात्रींत सांपडलेल्या जगांतल्या बहुसंख्य मानवतेचा तो आक्रोश आहे.

यशवंतांच्या कविमनाचा स्थायी भाव स्थिर नैराश्य आहे किंवा काय हें पाहण्याकरितां 'जगरहाटी' (पृ.२१) आणि 'नसे जग सर्वस्वीं अनुदार' (पृ.२३) या दोन कविता जोडीनें अभ्यासल्या पाहिजेत. तीव्र निराशा हें पहिल्या कवितेचें अधिष्ठान आहे हें खरें! पण दुसऱ्या कवितेंत तितकाच उत्कट आशावाद आहे. हे दोन्ही दृष्टिकोन एकाच कवीचे आहेत. आणि ते तसे असावेत यांत अस्वाभाविक असें काय आहे? विशिष्ट तीव्र अनुभूतींतून भाव-कविता निर्माण होते. पण अशा प्रत्येक अनुभूतींतून कवीचें जीवनविषयक तत्त्वज्ञान पूर्णपणें अथवा स्पष्टपणें व्यक्त होईलच असें नाहीं. भावकाव्यांतून जीवनाचें संपूर्ण दर्शन होत नाहीं. त्याचा एखादा पैलूच दृष्टीला पडतो.

'जगरहाटी' ही कविता मी यशवंतांच्या तोंडून प्रथमतः ऐकली तेव्हांची आठवण निराशावादाच्या आक्षेपाचा विचार करण्याच्या दृष्टीनें देण्याजोगी आहे. १९३४ च्या जुलै महिन्यांत मी पुण्याला गेलों होतों. यशवंतांकडेच उतरलों होतों. एके दिवशीं सकाळीं वामनराव जोशी यशवंतांच्याकडे आले. चहा आणि गप्पा यांच्या आस्वादांत दोन तीन घटका मजेंत गेल्या. वामनराव जायला उठले. उठतां उठतां ते म्हणाले, 'यशवंतराव, परवां म्हटलीत ती कविता म्हणून दाखवा बोवा. ती कितीदां ऐकली तरी तृप्तिच होत नाहीं.' यशवंतराव हसले आणि क्षण दोन क्षण खालीं पाहून, स्थिरचित्त होऊन त्यांनीं 'जगरहाटी' ही कविता म्हणायला सुरुवात केली. मी ती प्रथमच ऐकत होतों. ती कविता ऐकतां ऐकतां माझें मन भारावून गेलें. मी वामनरावांच्याकडे पाहिलें. ते अगदीं समरस झाले होते. वामनराव स्वभावतः अतिशय विचारी व संयमी. त्यांच्या एकंदर वृत्तींत विवेकाइतकेंच विनोदालाहि स्थान होतें. मनुष्य दुर्बळ

असला तरी तो दुष्ट नाहीं अशी त्यांची श्रद्धा होती. अशा विवेकी, आशावादी तत्त्वज्ञानें ‘ जगरहाटी ’ या कवितेंत रमून जावें याचें मला सुद्धां क्षणभर आश्चर्य वाटलें. मी विचार करूं लागलों. हळुहळू तें कोडें मला उलगडलें. यशवंतांची ही कविता केवळ विफलतेंतून अथवा निराशावादांतून उद्भवली नव्हती. जीवनांतल्या एका अत्यंत कटु सत्याचें तिच्यांत उत्कटतेनें चित्रण झालें होतें. शेक्सपीअरच्या दुःखान्तिकांत झालेलें असतें तसें. या चिरंतन कटु सत्याचे अनेक घुटके वामनरावांनींहि घेतले होते. हें सत्य अपूर्व सौंदर्याची जोड घेऊन या कवितेंत अवतरलें होतें व म्हणूनच तें वामनरावांना ‘ शिव ’ वाटत होतें.

यशवंतांच्यावर चिरनैराश्याचा आरोप करणारे टीकाकार आणखी एक गोष्ट विसरतात. जीवनांतल्या दुःखाचें चित्रण करणाऱ्या कारुण्यपूर्ण कविता लिहिणारे यशवंत वीरत्वाला आवाहन करणाऱ्या आणि दुर्दम्य आशावादानें रसरसलेल्या कविताहि लिहीत आले आहेत. ‘ तुरुंगाच्या दारांत ’ ( पृ. १०१ ), ‘ हा अफाट सागर पुढें ’ ( पृ. १०७ ), ‘ बाणा ’ ( पृ. ९८ ) अशीं कितीतरी नांवें या संदर्भात देतां येतील. या रसरशीत कवितांत कुठल्याहि प्रकारचा नकलीपणा नाहीं, निर्जीवता नाहीं, कृत्रिमता नाहीं. त्यांच्या करुण कवितांइतक्याच त्या सरस व सजीव आहेत. म्हणूनच मला वाटतें, बाळपणीं रामदासांच्या कवितेचे यशवंतांच्या मनावर जे सुसंस्कार झाले त्यांचा त्यांना कधींच विसर पडला नाहीं. ‘ वन्हि तो चेतवावा रे ! चेतवीतांचि चेततो ॥ ’ या उक्तीचें मर्म त्यांच्या मनांत सदैव मूळ धरून राहिलें. एवढेंच नव्हे तर तें प्रसंगानुसार पाल्वलें, फुललें, म्हणूनच जीवनांतल्या लहान मोठ्या दुःखांनीं विव्हळ होऊन अश्रु गाळणारा हा कवि हातांत खड्ग घेऊन झुंज घ्यायला सिद्ध झालेलाहि आपल्याला दिसतो. गोविंदाग्रज व यशवंत यांच्या काव्याची तुलना या निराशावादावर पुष्कळच प्रकाश टाकूं शकेल एवढें इथें सुचविणें आवश्यक वाटतें.

• •

जातिवंत भावकवीची कविता त्याच्या जीवनाच्या अनुषंगानें विकसित होत जाते हें यशवंतांच्या काव्यरचनेकडे पाहिलें असतां सहज दिसून येईल. ‘आई-’

पासून '.दैवतें मायतात ' पर्यंतच्या ' पाणपोई'तल्या विविध कौटुंबिक अनुभूती व्यक्त करणाऱ्या कविता पहाव्यात. कौमार्यापासून प्रौढपणापर्यंत प्रत्येकाच्या अनुभवाला येणाऱ्या हृदयंगम भावनांचा चित्रपटच आपण पाहत आहों असा वाचकाला भास झाल्यावांचून राहणार नाहीं. उत्तररामचरिताच्या पहिल्या अंकांत राम आणि सीता आपल्या गत आयुष्यांतील विविध प्रसंगांचीं चित्र पाहत आहेत अशी मोठी हृद्य व भव्य कल्पना भवभूतीनें केली आहे.

' जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिश्चिन्त्यमानानां ते हि नो दिवसा गताः ॥ '

या श्लोकापासून ' अविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ' या चरणापर्यंत राम आणि सीता यांच्या जीवनांतले मधुर आणि करुण प्रसंग भवभूतीनें चित्र-पटदर्शनाच्या त्या प्रवेशांत कल्पिले आहेत. यशवंतांच्या कौटुंबिक कवितांचा चित्रपट असाच हृदयंगम आहे. त्यांत मातृवियोगाच्या दुःखानें दुःखित झालेला विशींतला हळवा तरुण जसा आहे तसा आपल्या चिमण्या पिलांसाठीं सोसाव्या लागणाऱ्या कष्टांमुळें आईबापांनीं आपल्यासाठीं किती कष्ट सोसले असतील या जाणिवेनें सद्गदित होणारा अंतर्मुख पिताहि आहे.पतीला आवडणारें रायतें मुद्दाम राखून ठेवून त्याची वाट पाहणारी गरीब,प्रेमळ गृहिणी जशी त्यांच्या काव्यांत दिसते तशी पतीच्या लोकप्रियतेमुळें व सार्वजनिक कार्यामुळें त्याच्याशीं घटकाभर निवांतपणें बोलायला सुद्धां मिळत नाहीं म्हणून कुरकुर करणारी आधुनिक काळांतील प्रियतमाहि आढळते. वात्सल्य ही मानवी जीवनांतली केवढी प्रभावी भावना आहे हें ' मातृपदाविण ' (पृ. ४) व ' मृत्यूला म्हणतो सबूर ' (पृ. ५) या दोन कवितांत परस्पर विरुद्ध अनुभूतींतून मोठ्या परिणामकारक रीतीनें कवीनें चित्रित केलें आहे. ' मातृपदाविण ' मधें मुलांकरितां झुरणारी निरपत्य स्त्री आहे. ' मृत्यूला म्हणतो सबूर ' या कवितेंत आयुष्यांत सुखा-पेक्षां दुःखच ज्याच्या वांट्याला अधिक आलें आहे, त्या दुःखामुळें मृत्यु हा एका दृष्टीनें आपला मित्र आहे असें ज्याला वाटत आहे, पण आपलीं चिमणीं बाळें मोठीं होईपर्यंत त्यांच्यावर आपल्या मायेची पांखर हवी हें ज्याला तीव्रतेनें जाणवत आहे, अशा वत्सल पित्याचें हृदयस्पर्शी दर्शन आप-

त्याला होतें. चिमुकल्या फुलपांखराच्या पंखावरल्या रंगांतली लहानसहान सुंदर छटासुद्धां आपल्या कुंचल्यांतून निर्माण करणाऱ्या चित्रकाराप्रमाणें अगदीं सूक्ष्म व तरल अशा भावनेच्या छटेंतून आकर्षक काव्य निर्माण करण्याचें यशवंतांचें सामर्थ्य या कवितांप्रमाणें ' आईचें मन ' (पृ. ८) या कवितेंतहि सहजतेनें प्रगट झालें आहे.

यशवंतांचें कविमन स्वभावतः भावगंभीर आहे. तें विनोदांत फारसें रमत नाहीं. पण कौटुंबिक जीवनांतल्या हृदयंगम विनोदी छटा टिपून घेण्यांत ते चतुर आहेत हें ' कुरकुर ' व ' आईचें मन ' या कवनांवरून दिसून येईल. सर्व प्रकारच्या कौटुंबिक अनुभूतींशीं त्यांची प्रतिभा नेहमींच अशी उत्कटतेनें समरस होते.

• •

मात्र विविध कौटुंबिक भावनांत रमणारे यशवंत सामाजिक जीवनाविषयीं उदासीन आहेत असें मुळींच नाहीं. अनेक चांगले कवि विशिष्ट प्रकारच्या अनुभूतींशींच मनःपूर्वक समरस होतात. एखाद दुसरा विशिष्ट राग विलक्षण प्रभुत्वानें आळवणारे गायक असतात ना ? तसे ! विनायक,बालकवि, गोविंदाग्रज हे या जातीचे कवि. यशवंत तसे नाहींत.

त्यांचें बाळपण खेड्यांत व विद्यार्थिदशा सांगलीसारख्या लहानशा गांवांत गेली. तो काळहि तीस वर्षांपूर्वीचा. लाखों लोकांनीं गजबजलेल्या प्रचंड शहराच्या जीवनक्रमांत जो तो आपल्या पोटामागें धांवत असतो, कळत न कळत समाजाकडे यांत्रिक पद्धतीनें पाहतो. सुदैवानें यशवंतांचें बाळपण अशा परिस्थितींत गेलें नाहीं. जन्मभूमीच्या ओढीमुळें अजूनहि ते चाफळसारख्या खेडेगांवीं जातात, तिथें राहतात, तिथल्या निसर्गांत आणि मानवी सुखदुःखांत रमतात. त्यामुळें त्यांचें सामाजिक मन नेहमींच जागृत राहिलें आहे. काळाबरोबर आणि नवनव्या अनुभूतींबरोबर तें विकसित होत आलें आहे. अगदीं १९२८ सालीं त्यांनीं लिहिलेली ' घर ' ( पृ. १७ ) ही कविता पहावी. खेडुतांचा ओघ शहराकडे वळूं लागल्यामुळें तेथील जीवनांत व जीवनमूल्यांत होत चाललेला बदल कवीच्या सूक्ष्म दृष्टीनें किती कुशलतेनें या नाट्यगीतांत

टिपून घेतला आहे. विनोबा भाव्यांनीं एके ठिकाणीं लक्ष्मी व पैसा यांच्यांतला फरक मोठ्या मार्मिकपणानें विशद केला आहे. श्रमांतून निर्माण होते ती लक्ष्मी आणि दलालींतून किंवा खरेदी–विक्रींतून उत्पन्न होतो तो पैसा असें ते म्हणतात. अशाच प्रकारचे दोन जीवनविषयक दृष्टिकोन 'घर' या नाट्य-गीतांत चित्रित झाले आहेत.

'गृहिणी मी; नच देवी' (पृ. १८–१९) या कवितेंत नव्या काळा-बरोबर प्रामाणिकपणानें धांवूं पाहणाऱ्या तेजस्वी स्त्रीमनाचें मोठें स्फूर्तिप्रद चित्रण आढळतें. या कवितेंतील नायिकेची समतेची कल्पना केवळ पुस्तकी अथवा स्वतःला सोईस्कर अशी नाहीं. ती समतेची अपेक्षा करते. ती हक्का-पेक्षांहि कर्तव्यांच्या बाबतींत पतीच्या जोडीनें कष्ट करायला तयार आहे. देवता म्हणून स्त्रीनें निष्क्रिय होणें, जीवनकलहांत भाग न घेणें, त्यांतले वार अंगावर झेलायला तयार न होणें आणि जवाहिऱ्याच्या दुकानांतील एखाद्या मौल्यवान् दागिन्याप्रमाणें मखमली पेटींत जीवन कंठणें तिला मुळींच मान्य नाहीं. पतीच्या सुखाप्रमाणें त्याच्या दुःखांतहि ती खरीखुरी भागीदारीण होऊं इच्छिते. ती सरळच विचारते, 'कांचबाहुलीसमान जपणें का प्रीत तरी?' यशवंतांनीं मध्यमवर्गातल्या नव्या स्त्रीचें केलेलें हें चित्रण जितकें अभिनव तितकेंच प्रेरक वाटतें. इब्सेनच्या 'Doll's House' सारखें सुंदर नाटक अशा तेजस्विनीवर लिहितां येईल हा विचार राहून राहून माझ्या मनांत येतो.

'लिलाव' (पृ. २५) या कवितेंत काढलेलें एका दरिद्री कलावंताचें हृदयस्पर्शी चित्र असेंच काव्यात्म आणि नावीन्यपूर्ण आहे.

दुसरें महायुद्ध सुरू होईपर्यंत आपल्या सामाजिक मनाची कक्षा आर्थिक व सामाजिक विषमता आणि ती नाहींशी करण्याकरतां निर्माण झालेला स्थूल स्वरूपाचा ध्येयवाद यांच्या पलीकडे गेली नव्हती. पण या महायुद्धांत मनुष्यानें मध्यंतरीं अंगावर चढविलेल्या संस्कृतीच्या वस्त्रांच्या चिंध्या झाल्या. मानवी मनाचें आणि जीवनाचें स्वार्थी, लोभी आणि दांभिक स्वरूप पुन्हां एकदां स्पष्टपणानें लोकांच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. तोंडानें शांतीचा मंत्र म्हणत

आपापल्या देशांतले शस्त्रास्त्रांचे कारखाने वाढविणारे मुत्सद्दी, कुठेंहि गेलांत तरी मनुष्य एकच आहे असें प्रतिपादन करून माणसांमाणसांमध्यें जातीच्या, धर्मांच्या, राष्ट्रांच्या व वर्गांच्या भिंती उभारणारे नानाविध क्षेत्रांतले नेते, माणूस स्वभावतः सज्जन असल्यामुळें पवित्र आत्म्यांच्या कारखान्यांची परंपरा सुरू केली तर जगाची सुधारणा सहज होईल अशी अंधश्रद्धा बाळगणारे स्वप्नाळू ध्येयवादी इत्यादिकांचें सत्यस्वरूप गेल्या तपाइतकें स्पष्टतेनें जगाच्या इतिहासांत क्वचित्च उघड झालें असेल.

मानवतेच्या या दुःखाचें वर्णन करतांना यशवंतांच्या कल्पनेला चढणारी उपरोधाची धार आणि त्यांच्या वाणींत संचारणारा आवेश यांचा अवश्य उल्लेख केला पाहिजे. 'हा बालक बसला कागद टरकावीत' (पृ. ३३), 'सावध सावध' (पृ. २८), 'युगंधरांचें पालुपद' (पृ. ३५) या कविता यशवंतांच्या सामाजिक मनाचा गेल्या दशकांतला विकास चांगल्या रीतीनें व्यक्त करतात यांत संशय नाहीं.

युद्ध आणि शांति यासारख्या विशाल सामाजिक विषयाचें प्रभावी रीतीनें चित्रण करणारी यशवंतांची प्रतिभा प्रीतीच्या क्षेत्रांत किती नाजुक पावलांनीं विहार करते हें पाहण्याजोगें आहे. अंतराळांत डौलानें पंख पसरणाऱ्या गरुड पक्ष्यानें डोंगरमाथ्यावरल्या घरट्यांत परत आल्यावर आपल्या पिलांच्या किलबिलाटांत रमून जावें तशी त्यांची कविता प्रीतीचे विविध पैलु चित्रित करतांना भासते. प्रीतीची सफलता, तिची विफलता, मृत्यूवर मात करण्याची तिची शक्ति इत्यादि भावनांचें चित्रण 'गोल घुमटांत' (पृ. ३९) या कवितेपासून 'ताजमहाल' (पृ. ५०) या कवितेपर्यंत आपल्याला आढळतें. 'गोलघुमटां'तली एकरूपता, 'गुन्हेगारीण'मध्यें चित्रित झालेली उत्कटता, 'येसि कशाला दारीं !' मधली दुर्बलता आणि सात्त्विकता, 'प्रेमाची दौलत-' मधली उदात्तता यशवंत सारख्याच तन्मयतेनें चित्रित करतात. या प्रीतिगुच्छांतली 'तूंच रमणी' (पृ. ४८) ही कविता अनेक दृष्टींनीं मला अविस्मरणीय वाटते. ती यशवंतांच्या काव्य-लेखनाच्या पहिल्या अमदानींत लिहिली

गेली असती तर रसिकांच्या जिव्हाग्रावर नाचत राहिली असती. ती तशी न नाचण्याचें कारण ती गेय नाहीं, शिखरिणी वृत्तांत रच-लेली. आहे हें असूं शकेल. पण तें कांहीं माझ्या मतें तिच्या रसिका-कडून होणाऱ्या उपेक्षेचें प्रमुख कारण नव्हे. विपुल लेखन करणाऱ्या बहुतेक मोठ्या लेखकांना येणारा अनुभवच इथें यशवंतांच्या वांट्याला आला आहे. अशा लेखक–कवींचें प्रथमतः पुष्कळ कौतुक होतें, त्यांना अमाप लोकप्रियता लाभते. पण समुद्राच्या भरतीच्या लाटा कितीहि वेगानें व डौलानें उसळत पुढें येऊं लागल्या तरी त्यांच्या पुढें येण्याला मर्यादा म्हणून असतेच. प्रतिभेचेंहि तसेंच आहे. त्यामुळें तिचा पूर्ववयांतला विलास रसिकांना मोठा मोहक वाटतो. पण एका विशिष्ट मर्यादेपाशीं येऊन ती स्थिर झाली कीं वाचकांचें कौतुक ओसरूं लागतें. तिनें असेंच पुढें पुढें जावें, नवे नवे हृदयंगम विलास करावेत असें त्यांना वाटतें. तें कितपत शक्य आहे याचा फारसा विचार कोणी करीत नाहीं. याचा एक विचित्र परिणाम होतो. लेखकाच्या किंवा कवीच्या प्रतिभेचा पुढला विलास रसिक पूर्वीच्या उत्सुकतेनें आणि साक्षेपानें पाहत नाहींत. त्यामुळें एखादे वेळीं त्यानें अप्रतिम कलानिर्मिति केली असूनहि वाचकांचें तिकडे दुर्लक्ष होतें.

‘ तूंच रमणी ’ या कवितेच्या बाबतींत नेमकें, हेंच घडलें आहे. यशवंतां-च्या कौटुंबिक कवितांत ‘ दैवतें मायतात ’ चें जें स्थान आहे तेंच त्यांच्या प्रेमकवितेंत ‘ तूंच रमणी ’ या कवनाचें आहे. तारुण्यांतली भावनेची उत्कटता न गमावतां तिला प्रौढत्वांत झालेल्या जीवनाच्या सत्यदर्शनाची जोड देण्यांत यशवंतांनीं या कवितेंत प्रगट केलेलें कौशल्य अनुपम आहे. कल्पना–रम्यतेचें कवच फोडणें कथाकारांपेक्षांहि कवीला कठिण असतें. पण या कवितेंत वास्त-वाच्या चित्रणांतून कवीनें सौंदर्य निर्माण केलें आहे. जीवनाची परिपक्वता तिच्यांत सुंदर रीतीनें प्रतिबिंबित झाली आहे. प्रीतीचा प्रारंभ शारीरिक सौंद-र्यामुळें निर्माण होणाऱ्या आकर्षणांत असला तरी तिची परिणाति आत्मिक मील-नांत, बाह्य सौंदर्याकडे दुर्लक्ष करून अंतःसौंदर्याचा आस्वाद घेऊं शकणाऱ्या

विकसित मनांत होते हें यशवंतांनीं मोठ्या सुंदर रीतीनें या कवितेंत सूचित केलें आहे. कालाच्या सतत होणाऱ्या आघातांनीं इतर सर्व मूर्ती भंग पावतात; पण प्रीतीची मूर्ति मात्र त्याच आघातांनीं अधिक सुंदर होत जाते हें या कवितेंत सूचित झालेलें सत्य किती सूक्ष्म, तरल पण वास्तव आहे! उत्तररामचरिताच्या पहिल्या अंकांत भवभूतीनें रामचंद्राच्या तोंडीं हाच आशय व्यक्त करणारा एक मोठा मार्मिक श्लोक घातला आहे. ‘ पहिलें प्रेम ’ हें वाङ्मयांत वारंवार चित्रित केलें जातें. पण ‘ परिणत प्रेमा ’चीं चित्रें त्या मानानें फार विरळ आढतात. ‘ तूंच रमणी ’ हें अशा प्रकारचें मोठें मनोज्ञ चित्र आहे. या कवितेंतल्यां खालील ओळींचा विसर कुणाला पडेल ?

कपाळीं चिन्तेचे ध्वज सतत तुझ्या फडकती
कपाळीं कष्टांचे ढग सतत तुझ्या डंवरती
असो तें चिंचोळें, प्रिय मज तरी; फुंकर सखे—
तया घालायाला, कवळुनि उरीं, मानस भुकें.

तुझ्या काळ्या डोळ्यांभंवतिं वलयें काळसर तीं
कशीं केव्हां आलीं कुठुनि, मजला ज्ञात पुरतीं.
मृगाक्षी पद्माक्षी नसलिस तरी हींच वलयें
स्फुरे चुंबायाची म्हणुनि हृदयीं ओढ, सखये !

विषयांची विविधता हाहि यशवंतांच्या कवितेचा एक उल्लेखनीय विशेष आहे. ‘ नौकाविहारां’तलें ( पृ. ५१ ) कल्पनेनें नटलेलें मनोहर वर्णन, ‘ कसोटी’मधला ( पृ. ५६ ) मार्मिक उपरोध, शेवाळ्यानें झाकळलेल्या विहिरीचीं ( पृ. ५८–५९ ) भिन्न चित्रें, ‘ प्रतिमालेखन ’ मधील (पृ.६३) रेखीव चित्रण, या सर्वांत त्यांच्या प्रतिभेचें सामर्थ्य प्रकट झालें आहे.

विविधतेइतकीच त्यांची आत्मपरताहि आकर्षक वाटते. ‘ मांडवी ’ ( पृ. ७९ ) व ‘ मांडवी’च्या पुनर्भेटींत ( पृ. ८२ ) या कवितांतून व्यक्त झालेलें कविमन आणि कविजीवन यांचें दर्शन मोठें हृदयंगम आहे. आशीर्वाद

(पृ. ८०) मधील निराशेनें काळवंडलेलें कारुण्य आपल्या अगदीं काळजाला जाऊन भिडतें. ' मातेस ' ( पृ. ८९ ) या कवितेंत जनतेविषयीं कलावंताच्या मनांत येणारे विचार प्रामुख्यानें चित्रित झाले असले तरी त्यांचा मागोवा घेत मन पुढें जाऊं लागलें कीं नकळत इब्सेनचें 'Enemy of the people' व गॅल्सवर्दीचें 'Mob' हीं नाटकें आपल्या डोळ्यांपुढें उभीं राहतात. ' तुज-विषयिं अंतरीं प्रेम जरी । वाटते निरंतर भीति परी ! ' हे या कवितेंतले कवीचे उद्गार केवळ जगरहाटीचें वर्णन करीत नाहींत. जीवनांतल्या एका अत्यंत कटु सत्यावर ते भेदक प्रकाश टाकतात. व्यक्ति व समाज यांचें नातें जितकें निकटचें तितकेंच विचित्र असतें. बाप व मुलगा यांचे संबंध अत्यंत प्रेमाचे असावेत, पित्याची प्रत्येक कृति आपल्या कल्याणाचीच असते अशी श्रद्धा मुलानें ठेवावी, मुलाच्या विकासाकरितांच आपलें अस्तित्व आहे असें बापानें मानावें, इत्यादि कल्पना आपल्याला नेहमींच प्रिय वाटतात. पण जें प्रिय असतें तें सत्य असतें असें थोडेंच आहे ! प्रत्येक कुटुंबांतला अनुभव पहावा. वडील माणसांची एकच तक्रार कानावर येईल. ' मुलं कांहीं आमचं ऐकत नाहींत. ' जणूं कांहीं दोन पिढ्यांमध्यें सूक्ष्म अथवा उघड संघर्ष असावा असा निसर्गाचा संकेतच आहे. दोन पिढ्यांमधल्या या विसंवादावर मानसशास्त्र व समाजशास्त्र अंशतः प्रकाश टाकूं शकतात, नाहीं असें नाहीं. पण तें कांहीं असलें तरी दोन पिढ्यांच्या परस्परसंबंधांत प्रेम आणि संघर्ष या दोन्हींचें अस्तित्व आप-ल्याला नेहमीं मान्य करावें लागतें. व्यक्ति व समाज यांचे संबंधहि असेच संमिश्र आहेत. व्यक्तीचा विकास समाजांतच होतो. पण समाजमन हें व्यक्ति-मनासारखें संवेदनाशील नसतें. त्याचीं जीवनमूल्येंहि भिन्न असतात. व्यक्ति व समाज यांच्यांतला हा सनातन पण अत्यंत सूक्ष्म संघर्ष चित्रित करतांना यश-वंतांच्या चिंतनशीलतेचा चांगलाच प्रत्यय येतो. अशा तऱ्हेच्या आणखी कविता त्यांनीं लिहायला हव्या होत्या, असें वाटूं लागतें. ' The world is too much with us ' सारख्या वर्डस्वर्थच्या भावगंभीर सुनीतांत जीव-नाचें जें विशाल दर्शन होतें त्याची अनुभूति ' मातेस ' ही कविता निःसंशय आपल्याला देते.

• •

यशवंतांच्या विविध कवितांत ' आंधळा झालों तर ' या एकाच विषयावरलीं दोन सुनीतें आहेत. भावनांच्या भिन्न छटांवर आधारलीं असल्यामुळें तीं आकर्षक वाटतात. दुसरें सुनीत वाचतांना ' On my blindness ' या मिल्टनच्या सुनीताची आपल्याला आठवण होते. ' सुनीत ' हा काव्यप्रकार केशवसुतांपासून मराठींत रूढ झाला असला तरी आपल्याकडे चांगलीं सुनीतें फारच थोड्या कवींनीं लिहिलीं आहेत. अशा यशस्वी सुनीतकारांत केशवसुत, तांबे, माधवज्यूलियन व यशवंत हे प्रमुख आहेत. ' पाणपोई 'तील यशवंतांचीं सर्व सुनीतें या दृष्टीनें अभ्यसनीय आहेत. त्यांत कल्पना–चमत्कृति आहे. ' गोलघुमटा'मधें तर कल्पनेचा रम्य व भव्य असा विलास आहे—रचनासौष्ठव आहे, सुनीताच्या प्रकृतीची परिपूर्ण जाणीव आहे. ' गोलघुमटां'त ' या सुनीताचा इंग्रजींत कुणीं सुंदर अनुवाद केला तर कुठल्याहि इंग्रजी काव्यसंग्रहांत ' शेलीच्या 'Ozymandias ' या सुनीताच्या शेजारीं तें हक्कानें बसूं शकेल.

• •

यशवंतांच्या स्फूर्तिप्रद व आशावादी कवनांविषयीं मागें ओझरता उल्लेख झालाच आहे. त्यांचें स्वरूप किती तेजस्वी व उदात्त आहे याची कल्पना ' पाणपोई ' ( पृ. ९५ ) पासून या संग्रहांतल्या पुढल्या सर्व कविता वाचणाऱ्या रसिकाला सहज येईल. केशवसुत, बी, माधवज्यूलियन आणि कुसुमाग्रज यांनींहि अशी ओजस्वी कविता लिहिली आहे. पण यशवंतांच्या या प्रकारच्या कवितेचें स्वरूप पूर्वसूरि व समकालीन कवि यांच्यापेक्षां सर्वस्वीं भिन्न आहे. केशवसुतांच्या अशा कवितांचा भर सामाजिक क्रांतीवर आहे. बींच्या कवितेचा आत्मा तोच आहे. मात्र त्यांत तात्त्विकता अधिक आहे. ' पुरुषाची छाती ', ' भ्रांत तुम्हां कां पडे ', आणि ' पश्चिमेच्या मारुताचे उच्छ्वास ' या माधवराव पटवर्धनांच्या कवितांत त्यांच्या व्यक्तित्वाप्रमाणें त्यांचें राष्ट्रप्रेम व मानवताप्रेम यांचा उत्कृष्ट आविष्कार झाला आहे. या सर्व कवींचें आवाहनाचें—अंतःकरणांल्या सुप्त उदात्ततेला जागृत करण्याचें, बुद्धीला चिरंतन जीवनमूल्यांची जाणीव करून देण्याचें, प्रत्येक प्रकारच्या अन्यायाविरुद्ध माण-

साला बंड उभारायला प्रवृत्त करण्याचें, सत् आणि असत् यांच्या संघर्षाकडे क्षणिक किंवा वैयक्तिक दृष्टीनें न पाहतां विशाल दृष्टीनें पहायला लावण्याचें, प्रगतीला आवश्यक असलेला दुर्दम्य उत्साह निर्माण करण्याचें—सामर्थ्य मोठें आहे यांत शंका नाहीं. यशवंतांच्या प्रतिभेंतहि ती शक्ति आहे. पण तिच्या आविष्काराचें स्वरूप अगदीं निराळें आहे. तात्कालिकांतून स्फूर्ति मिळाली तरी ते अशा कवितांना चटकन चिरंतनाची जोड देतात. ‘ तुरुंगाच्या दारांत’ आणि ‘ गाऊं त्यांना आरती ’ या कवितांचीं बीजें असहकारितेच्या चळवळींत कवीनें पाहिलेल्या दृश्यांत आहेत. पण यशवंतांच्या कल्पक, आत्मनिष्ठ व झुंजार व्यक्तित्वाचे संस्कार झाल्यामुळें त्यांचा विकास किती निराळ्या रीतीनें झाला आहे, हें पाहण्याजोगें आहे. अशा ओजस्वी कविता लिहितांना यशवंत त्यांच्या मागच्या राजकीय किंवा सामाजिक पार्श्वभूमीला चिकटून राहत नाहींत. ती अनुभूति ते व्यापक स्वरूपांत घेतात व तिचें चित्र जीवनाच्या विशाल पार्श्वभूमीवर रंगवितात. त्यामुळेंच ‘ पाणपोई, ’ ‘ सरितेचें चरित, ’ ‘ हा अफाट सागर पुढें ’ अशा प्रकारच्या जीवनविषयक उदात्त तत्त्वज्ञानानें रंगलेल्या कविता त्यांच्या हातून निर्माण होतात. अशा विषयाशीं ते तद्रूप झाले म्हणजे त्यांच्या कल्पकतेला जणूं बहर येतो. नवनवीं सुंदर रूपकें त्यांना सुचतात. त्यांची शैली भट्टींतल्या प्रवाही लाल लोखंडाच्या रसाचें स्वरूप धारण करते. मग हळुवार भावनांनीं फुललेल्या कौटुंबिक कविता लिहिणारे यशवंत आणि उफाळणाऱ्या ज्वाळांची आठवण करून देणाऱ्या तेजस्वी कविता रचणारे यशवंत हे दोन निरनिराळे कवी असावेत असा क्षणभर मनाला भास होतो. पण थोडें सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें कीं हा विरोध वरवरचा आहे हें लक्षांत येतें. जीवनविषयक मूल्यांपैकीं निरपेक्ष प्रेमाचे—आणि म्हणूनच वात्सल्याचे—यशवंत निःसीम उपासक आहेत. वात्सल्य म्हटलें कीं तिथें त्याग आलाच. मानवी जीवनांतली सर्व मंगलता या त्यागाच्या भावनेवर अवलंबून आहे. ही भावना वगळली तर मनुष्य आणि पशु यांत फारसें अंतर उरणार नाहीं हें यशवंत फार चांगल्या रीतीनें जाणतात. कुटुंबासाठीं, ध्येयासाठीं, देशासाठीं,

समाजासाठीं, अनाथअपंगांसाठीं किंवा मानवतेसाठीं, आपलें सुख विसरणारा मनुष्यच मनुष्य या नांवाला पात्र असतो अशी त्यांची श्रद्धा आहे. ‘ अन्य नको वरदान ’ या कवितेंत जी उत्कटता उतरली आहे ती यशवंतांच्या या विशिष्ट जीवननिष्ठेंतून. दुसऱ्याच्या दुःखावर आपलें सुख शिजवून घेणारे जगांत जोंपर्यंत निर्माण होत राहतील तोंपर्यंत सज्जनांना आणि सात्त्विकांना त्या दुःखी, दलित व दुर्दैवी लोकांच्या बाजूनें लढतच रहावें लागेल. या लढाई-तल्या जखमा कांहीं मोठ्या सुसह्य असतात असें नाहीं. पण त्या जखमांतून रक्त ठिपकत असतांना त्यांच्या वेदनांनीं शरीर व्याकुळ होत असतांना प्रसंगीं मुखांतून दुःखाचे चीत्कार निघत असतांनाहि सज्जन लढत राहतोच. शरीरावर विजय मिळविण्याइतके ज्याच्या आत्म्याच्या अंगीं सामर्थ्य असतें तोच खरा सज्जन; या यशवंतांच्या निष्ठेंत त्यांच्या ओजस्वी कवितांचा उगम आहे.

करुणरसाइतकेच वीररसावरहि प्रभुत्व असणारे सत्कवि फार क्वचित् आढळ-तात. या विरळ कवींत मी यशवंतांची गणना करतों. हें दुर्लभ यश ते मिळवूं शकले याचें कारण एकच आहे. त्यांच्या व्यक्तित्वांत शरीर आणि आत्मा यांचीं मूल्यें परस्परविरोधी राहिलेलीं नाहींत. तीं एकमेकांना पूरक झालीं आहेत. केवळ शरीरसुख किंवा आत्मसुख हा मानवी जीवनांतला प्रेरक केंद्र-बिंदु होऊं शकत नाहीं, याची त्यांना अतिशय तीव्र जाणीव आहे. त्यामुळें शरीराच्या लहान सुखदुःखाइतकेंच आत्म्याच्या सूक्ष्म सुखदुःखानेंहि त्यांचें मन कंपित होतें. ओहोटीच्या वेळीं मागें मागें हटणारा समुद्र भरतीच्या वेळीं जसा वेगानें पुढें येतो तसें त्यांचें हें दोन रसांवरलें प्रभुत्व आहे. त्यामुळेंच ते सामान्य माणसाला जवळचे वाटतात. किंबहुना आपल्या समकालीनांपैकीं दुसऱ्या कुठल्याहि कवीपेक्षां ते १९२०–४० या कालखंडांतल्या सामान्य मनुष्याचे अधिक योग्य असे प्रतिनिधि होते. आणि म्हणूनच त्यांना असामान्य लोकप्रियता लाभली.

• •

रविकिरण–मंडळाच्या प्रमुख कवींनीं काव्यक्षेत्रांत अनेक नव्या सुंदर गोष्टींची भर घातली. पण त्यांचा संबंध काव्याच्या बहिरंगाशीं आहे; अंतरंगाच्या दृष्टीनें पाहिलें तर कविता लोकप्रिय करण्याच्या नादांत त्यांनीं काव्याची पातळी थोडी खालीं आणली, सामान्य मनुष्याच्या कक्षेंत येणाऱ्या कल्पना-भावनांच्या रंगणांतच ते फिरत राहिले, अशा प्रकारचा आक्षेप अनेकदां घेतला जातो. कुसुमावती देशपांड्यांसारख्या अभिजात टीका-कारांच्या लेखनांत सुद्धां हा सूर आढळतो. त्याची विस्तृत चर्चा इथें शक्य नाहीं. पण यशवंतांच्यापुरतें पाहिलें तर या आक्षेपांत पराचा पारवा केला गेला आहे असेंच दिसून येईल. कवि किंवा लेखक ज्या काळांत निर्मिति करतो त्या काळाचा कळत नकळतच तो प्रतिनिधि बनतो. त्यामुळें १९२०–४० या कालखंडांतले अनेक गुणदोष त्या वेळीं अग्रभागीं असलेल्या कवि–लेखकांच्या-प्रमाणें यशवंतांच्याहि निर्मितींत आढळतील. आयुष्यांत प्रतिकूल परिस्थितीशीं सदैव टक्कर द्यावी लागल्यामुळें त्यांच्या प्रतिभेंतलीं अनेक विकासक्षम बीजें जशीं फुलावीं तशीं फुललीं नाहींत हेंहि खरें! पण या सर्व त्यांच्या मर्यादा झाल्या. मित्राचें मोल आपण त्याच्या गुणांकडे पाहून ठरवतों, दोषांवर बोट ठेवून नाहीं. लेखकाकडेहि रसिकांनीं त्याच दृष्टीनें पाहिलें पाहिजे. त्याच्या प्रतिभेच्या मर्यादा सहानुभूतीनें जाणल्या आणि तिच्या विविध शक्तींकडे रसिकतेनें पाहिलें तरच आपण त्याला न्याय देऊं शकूं. उठल्यासुटल्या प्रत्येक कवीची केशव-सुतांशीं आणि प्रत्येक कादंबरीकाराची हरिभाऊ आपट्यांशीं तुलना करून तो त्यांच्या मानानें खुजा ठरतो असें सूचित करण्याचा छंद अनेक आधुनिक टीकाकारांना जडला आहे. या छंदाचा उगम डोंगर दुरूनच चांगले दिसतात या उक्तींत असो, वाङ्मयाच्या उच्च मूल्यांच्या उपासनेंत असो अथवा खोड काढल्याशिवाय जेवतां न येणाऱ्या मुलासारखीच कांहीं टीकाकारांची प्रकृति असते म्हणून हें घडत असो, या पद्धतीमुळें लेखकाला न्याय मिळण्यापेक्षां अन्यायच अधिक होतो असें मला वाटतें. शतकाशतकांतून वाहत आलेल्या वाङ्मयाच्या भिन्न भिन्न प्रवाहांची तुलना करायची असेल त्या वेळीं अशा प्रकारची चिकित्सा योग्य होऊं शकेल. पण मानदंड म्हणून एक कुठली तरी

उच्च कलाकृति हाताशीं धरायची आणि काळ, व्यक्तित्व, प्रतिभा, परिस्थिति यांच्यांतले भेद लक्षांत न घेतां तो दंड पुढल्या पिढींतल्या प्रत्येक लेखकाच्या डोक्यांत घालायचा ही कांहीं रसग्रहणाची किंवा मूल्यमापनाची उत्कृष्ट पद्धति होऊं शकत नाहीं. उद्यां हिमालयांत राहणारा एक लामा उठला आणि सह्याद्रीच्या पठारावर वावरणाऱ्या मावळ्याला तुझा पर्वत माझ्या इतका उंच नाहीं म्हणून हिणवूं लागला तर तुझ्या हिमालयावर माझ्या या पर्वतासारखे पराक्रमी किल्ले आहेत का, हा प्रश्न त्या मावळ्यालाहि त्याला विचारतां येईल. वाङ्मयांत काय किंवा जीवनांत काय अशा अप्रस्तुत तुलना बहुधा भ्रामक ठरतात !

● ●

कुठल्याहि प्रकारचा पूर्वग्रह न बाळगतां यशवंतांची कविता वाचणाऱ्या आजच्या रसिकाला त्यांच्या प्रतिभेचें बळ कशांत आहे व तिच्या मर्यादा कोणत्या हें सहज समजण्याजोगें आहे. केशवसुतांच्या ‘ झपूर्झा ’ किंवा ‘ हरपलें श्रेय ’ या कविता थोड्या क्लिष्ट भासल्या तरी उत्कृष्ट आहेत. श्रेष्ठ कवीनें अशा कविता लिहिल्या पाहिजेत असा ज्यांचा अट्टाहास असेल त्यांची यशवंतांच्या बाबतींत थोडीशी निराशा होणें स्वाभाविक आहे. त्या कविता सांसारिक जीवनांतल्या अनुभूतींनीं विशेष अंतर्मुख होत जाणाऱ्या वृत्तीच्या द्योतक आहेत. यशवंत विवेकी आहेत, संयमी आहेत. पण स्वभावतः ते संसाराचा रस चाखणारे आहेत. ते एकलकोंडे नाहींत. मुलांबाळांच्या आणि स्नेह्यांसोबत्यांच्या सहवासांत सुखदुःखाचे घुटके घेतां घेतां त्यांची कविवृत्ति फुलते. ‘ दिवाळी ’ या कवितेच्या शेवटीं सारे लोक दिवाळीच्या आनंदांत मग्न असले तरी मी गिरणेच्या तीरावर एकटाच गाणीं गात बसेन असे केशवसुतांनीं उद्गार काढले आहेत. ती वृत्ति यशवंतांच्या काव्यांत सहसा आढळणार नाहीं. ‘ मातेस ’ सारख्या कवितेमध्यें त्यांची चिंतनशीलता चांगल्या रीतीनें व्यक्त झाली आहे. पण अशा कविता फार थोड्या. वैचारिकता, चिंतनशीलता, अंतर्मुखता किंवा गूढगुंजन हे त्यांच्या कवि-प्रकृतीचे विशेष नव्हेतच. सत्प्रवृत्त संसारी व्यक्तीच्या लहानमोठ्या सर्व भावभावनांची उत्कटता, ती व्यक्त करणारी—क्वचित् किंचित् दाठर भासणारी पण आपल्या ओघाबरोबर रसिकाला

ओढून नेणारी—शैली आणि संस्कृत व मराठी काव्यांचे संस्कार दर्शवीत तरलता आणि विशालता यांचा सुवर्णमध्य साधणारी कल्पकता यांनीं त्यांची कविता मुख्यतः नटली आहे.

केशवसुतांसारखी तात्त्विक कविता यशवंत लिहूं शकले नाहींत तरी 'गोष्टी घराकडिल मी वदतां गड्या रे' या रसाळ कवितेपेक्षांहि अधिक भावगर्भ व अधिक सुंदर अशा कौटुंबिक कविता त्यांच्या लेखणींतून लीलेनें अवतरल्या आहेत. त्यांच्या इतकी विविध, विपुल व सरस कौटुंबिक कवनें दुसऱ्या कुणाहि कवीनें लिहिलेलीं नाहींत.

केशवसुतांच्या ओजस्वी कवनांत सामाजिक क्रांतीचें आवाहन आहे. कुसुमाग्रजांच्या तेजस्वी कवितांत राजकीय क्रांतीचीं स्तोत्रें आहेत. यशवंतांच्या रसरशीत कवनांना हीं दोन्ही अधिष्ठानें स्पष्टपणें लाभलेलीं नाहींत. ('सत्य न मरतें दळभारें' अशा कांहीं कविता वगळून) पण त्यांची अशा प्रकारची सारी कविता उत्कट स्फुरणांतून लिहिली गेली आहे. मानवी जीवन ही लढाई आहे या भावनेनें ती प्रेरित झाली आहे. तिच्यांतून झळकणाऱ्या ओजस्वी व उदात्त छटा विलक्षण परिणामकारक आहेत. 'Say not the struggle nought availeth' सारख्या इंग्रजी कविता यशवंतांच्या अशा कवितांपुढें फिक्क्या वाटतात. ओजस्वी काव्य निर्मितींत केशवसुत व कुसुमाग्रज यांच्या जोडीनें त्यांचेंच नांव घ्यावें लागेल.

त्यांची प्रेमकविताहि मोकळी व मधुर आहे. तिच्यांत गोविंदाग्रजांची आर्तता व कल्पना—चमत्कृति नसेल. पण पूर्वकवींच्या अशा प्रकारच्या कवितेंतला संकोच व संदिग्धपणा त्यांच्या काव्यांत आढळणार नाहीं. 'गोलघुमटांत' 'गुन्हेगारीण,' 'येसि कशाला दारीं ?', 'तूंच रमणी 'या कविता बाजूला ठेवून मराठींतल्या प्रेमगीतांचा संग्रह कोण पुरा करूं शकेल ?

'प्रेमगीतें' हा शब्द मीं वापरला. पण यशवंतांची कविता—त्यांच्या भावपूर्ण काव्यगायनामुळें लोकप्रिय झालेली आणि ठिकठिकाणीं गायिली जाणारी कविता—ही मूलतः केवळ गेय स्वरूपाची नाहीं. भावगीतांच्या नांवाखालीं

सध्यां जी गोड गोड शब्दांची जुळणी आणि सांकेतिक कल्पनांची पेरणी केली जाते त्याच्यापासून त्यांची कविता सर्वस्वीं आलिप्त असावी हें स्वाभाविकच आहे. दत्त, तांबे, बालकवि आणि बोरकर यांच्यासारख्या अभिजात कवींच्या काव्यांत आढळणारें नादमधुरतेचें नर्तन जसें तिच्यांत नाहीं, तशी त्या नादाच्या मोहिनीनें येणारी कृत्रिमता किंवा ठराविक शब्दांची व कल्पनांची पुनरुक्तिहि नाहीं. याचा अर्थ त्यांच्या काव्यरचनेंत सौष्ठव नाहीं असा मात्र नाहीं. केशवसुताप्रमाणें चपखल शब्द शोधण्याची अयशस्वी धडपड त्यांच्या कवितेंत कधींच आढळणार नाहीं. काव्यरचनेच्या प्रारंभकाळीं साधुदासांसारख्या पंडितकवींचें गुरुत्व त्यांना लाभलें. त्यामुळें संस्कृत शब्दांचा सढळ हातानें केलेला वापर व समासप्रचुर रचना हे पंडिती काव्यरचनेंतील विशेष यशवंतांच्या काव्यांत अधूनमधून डोकावतात, नाहीं असें नाहीं. पण साधुदासांचें गुरुत्व एकंदरींत त्यांच्या कवितेला उपकारकच ठरलें असें म्हणायला हरकत नाहीं. रसानुकूल व भरघोस अशा शब्दसंपत्तीचा वारसा त्यांना तिथेंच मिळाला. शब्दांच्या बाह्य सौंदर्यापेक्षां त्यांच्या परिणामकारकतेकडे लक्ष देण्याची दीक्षा त्यांना रामदासांनीं दिली असावी. ‘ मृत्यूला म्हणतों सबूर ’ सारख्या रचनेचा परामर्श घेतांना ही गोष्ट अवश्य लक्षांत ठेवली पाहिजे. त्यांच्या शैलीइतकी अस्सल मराठी शैली—नादमाधुर्यासाठीं अथवा अन्य कारणानें संस्कृतप्रचुर न झालेली, दैनंदिन जीवनांतील आणि संभाषणांतील भाषा काव्यांत योजूनहि त्याचें सौंदर्य कमी न होऊं देणारी, कोमलतेपासून कठोरतेपर्यंत सर्व प्रकारच्या भावनांना अनुरूप असा वेष चपलतेनें धारण करणारी आणि कोणत्याहि प्रकारच्या कृत्रिमतेला थारा न देणारी—आधुनिक कवींत क्वचितच आढळेल.

‘ स्वामी तिन्ही जगांचा । आईविना भिकारी, ’
‘ ये रागवावयाहि । परि येइं येइं वेगें, ’
‘ कुठुन झोप मजसि ? सुनी बाकिची उशी !,’
‘ पाहोनी चिमणी पिलां भरविते आणून चारा मुखीं ।
आपोआप मनांत बोल उठले ‘ मृत्यो, नको येउं कीं ।’

‘ ते हवेत माझे मला । सखे ! परि भंवतिं सदा गलबला । ’

अशा ओळी ‘ पाणपोई ’च्या पानापानावर आढळतील.

• •

यशवंतांच्या काव्याचें अंतर्बाह्य स्वरूप असें आहे. नवनव्या अनुभूतींना स्पर्श करण्यापेक्षां परिचित अनुभूतीच फुलवून सांगण्यांत त्यांची कल्पकता अनेकदां रममाण होते. तिनें अधिक विशाल क्षेत्रांत संचार केला असता तर बरें झालें असतें असें माझ्यासारख्या त्यांच्या समकालीनाच्या मनांत क्वचित् येतें. पण जर–तर जगांत नाहींत कुठें ? जयविजयाप्रमाणें जीवनाचे ते जणूं कांहीं द्वारपाळच आहेत !

श्रेष्ठ भावकवीला आवश्यक असणारे बहुतेक गुण यशवंतांच्या कवितेंत आहेत. जिवंत भावना ( Emotion ) व भावनेचा आभास (Sentimentalism) यांतलें अंतर सर्वसामान्य वाचकाला न ओळखतां आल्यामुळें अनेक नकली काव्यें कांहीं काळ विलक्षण लोकप्रियता संपादन करतात. काळ हाच अशा खऱ्या-खोट्या काव्यांतला भेद स्पष्ट करणारा उत्कृष्ट परीक्षक असतो. यशवंतांची कुठलीहि चांगली कविता घेतली—मग ती ‘ दैवतें मायतात ’ ही असो अथवा ‘ अन्य नको वरदान ’ असो—तरी तिच्यांत जिवंत भावनेचा खळ-खळाटच आढळेल. त्यामुळेंच कुठल्याहि अनुभुतीचें ते लीलेनें रसांत रूपांतर करूं शकतात. त्यांच्या काव्यांतलें चित्रणहि जितकें अकृत्रिम तितकेंच स्वच्छ असतें. वानगीदाखल

‘ तूझ्या विना न कोणी । लावील सांजवाती ॥
सांगेल ना म्हणाया । आम्हां ‘ शुभं करोति ’ ॥ ’

‘ नाहणीघरीं । उपसलें जरी ।
ऊन पाणि निवुन जाय भान ना तरी ’

‘ शालुहिरा कालवडी देती हुंकारा ।
टवकारिति कान जरी वाजे दरवाजा ॥ ’

या ओळी पहाव्यात. प्रत्येक ठिकाणचें चित्र किती स्पष्ट आहे. जणूं चित्रपटाच्या दिग्दर्शकानें आधीं मनासारखी मांडणी करून मगच तें चित्रित करायला सुरुवात केली आहे.

त्यांच्या कवितांतलें संगीत सामर्थ्यहि ( Musical power ) सामान्य नाहीं.

‘ सहज होय तें । रुचिर रायतें ।
उरवितें न सेवितांहि विटुन जाय तें । ’
‘ झोपेनें पेंगुळली तरि न निजे मंजी, ’
‘ मौनाचेंहि तुझ्या निनाद घुमती, ही मन्मनीं सूक्ष्मता ! ’
‘ पतनींहि नक्षत्रांची प्रेक्षणीय मुद्रा, ’
‘ हा मधुन लोंबतो धवल पदर स्कंधिंचा, ’
‘ वायुवीची भोंवतीं आंदोलुनी त्या वंचिताती, ’
‘ रांगत, लोळत, दौडत घोळत । कडेकपारींतुनी खळाळत ’
‘ बांधुनिया अंधार कोठड्या, वधस्तंभ रोवुनी ।
बलोद्धतांनो ! धराल का अवतारकार्य रोधुनी ?’

या ओळी गुणगुणतांना त्यांचें सौंदर्य कसें वृद्धिंगत होतें हा अनुभव घेण्याजोगा आहे.

• •

आधुनिक मराठी कविता गेल्या साठ वर्षांत हळुहळू विकास पावत आली आहे. आज पुन्हां ती संक्रमणावस्थेंत आहे. उद्यां तिचा प्रवाह कदाचित् निराळ्या दिशेनें वाहूं लागेल. पण तो कोणत्याहि दिशेनें गेला तरी जेव्हां जेव्हां तो मागें वळून पाहील, तेव्हां तेव्हां केशवसुतादि सात आठ कवींना त्याला कृतज्ञतेची पुष्पांजलि वहावीच लागेल. या अग्रेसर कवींच्या पक्तींत यशवंतांचें स्थान सदैव अढळ राहील.

कोल्हापूर
नोव्हेंबर १९५१ —वि. स. खांडेकर.

## “ पाणपोई ” तील कावडी

### कौटुम्बिक



### सामाजिक :

प्रेमविषयक :



संकीर्ण :



आत्मदर्शी :

# पुष्पसमर्पण

[ जाति—बालमुकुन्द ]

मम सुमन कुणा हें वाहूं कमलावरा ?
जरि कुणी शिरीं धरिल या तरी प्रफुल्लता ये भरा !

या रङ्गच कोणी म्हणतो नच चाङ्गला
कीं डौलच कोणी म्हणतो न दिसे भला
कीं गन्धच कोणी म्हणतो न रुचे मला
ह्या अवगणनेनें पडति घरे अन्तरा !

करि निन्दा कोणी शुद्ध न याची कुळी
क्षणभङ्गुर गणुनी घेच कुणी ना मुळीं
उपयुक्तपणा तर याचा कोणी तुळी
करि निकष जगाचा भाविकतेचा चुरा !

गिरि गोवर्धन तो सहज तुम्हीं तोलिला
पूतनास्तन्य वा प्याला हालाहला
तर तुम्हीच मग ह्या घ्या हो माझ्या फुला
हो मलिन विमल हा प्रभाव तुमच्या करां !

२४-७-२७

# १. आई

[ जाति–रसना ]

‘ आई ’ म्हणोनि कोणी आईस हाक मारी
ती हाक येइ कानीं मज होय शोककारी
नोहेच हाक, मातें मारी कुणी कुठारी
आई कुणा म्हणूं मी ? आई घरीं न दारीं !
ही न्यूनता सुखाची चित्ता सदा विदारी
स्वामी तिन्ही जगांचा आईविना भिकारी.

चारा मुखीं पिलांच्या चिमणी हळूच देई
गोठ्यांत वासरांना ह्या चाटतात गाई
वात्सल्य हें पशूंचें मी रोज रोज पाहीं
पाहून अन्तरात्मा व्याकूळ मात्र होई
वात्सल्य माउलीचें आम्हां जगांत नाहीं
दुर्भाग्य याविना का आम्हांस नाहिं आई.

शाळेंतुनी घराला येतां धरील पोटीं
काढून ठेविलेला घालील घास ओठीं
उष्टया तशा मुखाच्या धावेल चुम्बना ती
कोणी तुझ्याविना गे का ह्या करील गोष्टी ?
तूझ्याविना न कोणी लावील साञ्जवाती
साञ्जेलना ना म्हणाया आम्हां ‘ शुभम् करोति ’

ताईस या कशाची जाणीव कांहिं नाहीं
त्या सान बालिकेला समजे न यांत कांहीं

पाणी तरारतांना
ऐकूनि घे परन्तु
साङ्गे तसें मुलींना
ते बोल येति कानीं

आई ! तुझ्याच ठायीं
माहेर मङ्गलाचें
गाम्भीर्य सागराचें
नेत्रांत तेज नाचे

वात्सल्य गाढ पोटीं
वास्तव्य या गुणांचें
गुम्फून पूर्वजांच्या
साऱ्या सभाजनांनीं

आई, करावया तूं
या न्यूनतेमुळें ही
पञ्चारती जनांची
परि जीव बालकाचा

येशील तूं घराला
दवडूं नको घडीला
हे गुन्तले जिवींचे
कर्तव्य माउलीचें

रुसणार मी न आतां
ये रागवावयाही

नेत्रांत, बावरे ही
" आम्हांस नाहिं आई "
" आम्हांस नाहिं आई "
" आम्हांस नाहिं आई ! "

सामर्थ्य नन्दिनीचें
अद्वैत तापसांचें
औदार्य या धरेचें
त्या शान्त चन्द्रिकेचें

त्या मेघमण्डळाचें
आई, तुझ्यांत सांचे
मीं गाइलें गुणांला
या वानिलें कृतीला

नाहींस कौतुकाला
मज त्याज्य पुष्पमाला
ना तोषवी मनाला
तव कौतुका भुकेला

परतून केधवां गे
ये ये निघून वेगें
पायीं तुझ्याच धागे
करण्यास येइं वेगें

जरि बोलशील रागें
परि येइं येइं वेगें

२२-१-२२

## . २ . प्रतीक्षा

[ जाति—नवती ]

दार वाजलें उठुन धावलें
पाहिलें, परन्तु नाहिं कोणि पातलें !
केशविरचनीं हातुनी फणी
गळुनि पडे तरि न पटे शकुन कां झणीं !
नाहणी—घरीं उपसलें जरी
ऊन पाणि निवुन जाय भान ना तरी
जाळ फुरफुरे पापणी स्फुरे
अजुन यायचें न कसें ! हृदय हें झुरे
भाकरी करीं चढत ना वरी
करपुनीहि जाय दुजी ही चुलीवरी
सहज होय तें रुचिर रायतें
उरवितें न सेवतांहि विटुन जाय तें !
तान्हुली सुशी झोपते कुशीं
कुठुन झोप मजसि ? सुनी बाकिची उशी !

*   *   *

यायचा उद्यां असुन वायदा
ऊठ सुशी, कोण पहा — तिजसि झोपुं द्या
याल आजला भरंवसा मला
ऊठ सुशी खाउ — तुम्हिच घ्या नि द्या तिला.

१-१०-२७

## ३. मातृपदाविण

[ जाति—बालमुकुन्द ]

मज विफल गमे ग जीवित माझें सखे !
सुख किती जरी उणिव ही परी मिळति न शिशुचे मुके
ही चिमणी चारा आणुन घाली पिला
ही पहा वानरी फिरते घेउन मुला
निज कटि-खान्दीं ही लतिका मिरवी फुला
मज हिणविति त्यांचीं वत्सल हीं कौतुकें !
तें अशुभ जसें ग देउळ शिखराविना
नच चन्द्रावांचुन शोभा ताराङ्गणा
मज निष्फळ तैसा गमतो हा स्त्रीपणा
मम तात घरीं या येउनि जाती मुके !
मी शिकत बसूं ग कुणी झबलें कुणा ?
मी माझ्या मुखिंचा घास भरवुं ग कुणा ?
मुख बघुन कोणतें स्वर्गाहि मानूं उणा ?
हो स्वर्गसौख्यही मातृपदाविण फिकें ?
मी बघुन कुणाला विसरूं हृदयव्रणा ?
प्रिय अधिकचि होइन केव्हां त्यांच्या मना ?
काधिं चिरञ्जीवता येइल सम्मीलना ?
का बालभानुविण वितळुन जाई धुकें ?

२०-१०-२७

## ४. मृत्यूला म्हणतों सबूर!

[ सुनीत—शा. विक्रीडित ]

मृत्यूतें जन वाहतात, परि ते भोगास वैतागुनी;
'मृत्यो, येउं नको' असे विनविते सारे परन्तू मनीं.
आहें मीहि सुपांतलाच कण त्या जातें न ज्यातें टळे
मृत्यूला म्हणतों सबूर, परि तें ना स्वार्थवृत्तीमुळें

नाहीं रूप, रुबाब, सौष्ठव, तसें आरोग्य नाहीं जरी
देहाचा मग लोभ काय म्हणुनी चित्तीं असावा तरी?
जैसें शस्त्र युधिष्ठिरा, तनु तशी कर्तृत्ववानाप्रती
तें कर्तृत्व घडेल हातुन तरी आहे कुठें शाश्वती?

गुन्ताया मन दौलतींत अथवा, आहे कुठें दौलत?
भाण्डीं आणि खिसे कुडासह तसें कौलार छिद्रान्वित
स्नेहज्योति न काजळीविण दिसे, सत्सङ्गदुर्भीक्ष्य तें—
टाळाया मरणा प्रलोभन महा आहे तरी कोणतें?

पाहोनी चिमणी पिलां भरविते आणून चारा मुखीं
आपोआप मनांत बोल उठले 'मृत्यो, नको येउं' कीं.

१३-१-१९३८

## ५. कुरकूर

[ जाति–शूर्पणखा ]

'ते' हवेत माझे मला
सखे ! परि भंवतिं सदा गलबला ॥ ध्रु० ॥

हे मधुप फुलांभोंवतीं
डोलती जसे गुञ्जती
लोभले तेंवि सोबती
तयांचा ओघ न कधिं आटला

हीं कितीक बोलावणीं
घडि मुळीं न जाई सुनी
परि विचार न करी कुणी
किती हा असेल जिव भागला

ती मोहक बैठक जनीं
सुम लतिकापर्णांतुनी
खुलतसे हिरा कोन्दणीं
जेंवि कीं नभांत इन्दू-कला

हें विभव असें आगळें
मज हेंहि न का ग कळे !
परि इतरां मिळतीं फुलें
असोनी दारीं तरु बहरला

बघ खुशाल मोत्याहि तो
त्या अङ्कावर झोपतो
हिणवितो जणूं चिडवितो–
हि मेला खट्याळ मुलखांतला !

निर्वेध असावें जिणें
दिन-रात्रीं व्यापाविणें
चिर सङ्गत अशि लाभणें
कधीं ग ? छाया जशि वस्तुला

२१-५-२९

## ६. आईचें मन

[ ओवी छन्द ]

नको येऊं आंत अशी सये भरल्या पायांनीं
उभी रहा जरा दारीं, घेई पायांवरी पाणी
नको जाऊं धस्सदिशीं अशी पाळण्याजवळी
दचकेल बाळी जशी फुङ्करानें दीपकळी
नको घेऊं गडे अशी धसमुसळेपणानें
घ्यावी गुलाब-पाकळी किति नाजुक हातानें
नको सोडूं भण्डावून मुके सारखे घेऊन
खदखदा खिदळून बाळी होईल हैराण
नको करूं—अगबाई ! – फेकाफेकीचा हा खेळ
तुला काय दाण्डगलि ! येई साङ्गून का वेळ ?
नको, कशाला इतुकीं लेणीं, हवा थाटमाट ?
कोर साधीच खुलते; लाव तरी गालबोट
अशा कातरवेळेला नको बाहेर नेऊंस
दृष्ट लागेल, फुलांचा कोमेजेल माझा घोस
तसं नव्हे ग, रागावूं नको बोलल्यें म्हणून
परि राहे न आईचा जीव बोलल्यावांचून
मिळाला ग आहेर का ? छान शकुन जाहला !
कळो येईल आईचें मन पुढल्या वर्षाला

२५-२-३६

## ७. मोक्षाचीं दारें

[ जाति–दिण्डी ]

नको चुम्बन मज देउं तुझें बाळा !
नसे तितुकी शुद्धता मम मुखाला.

नको त्या त्या अश्लील शब्द-कोटी
प्रगट झाल्या माझिया सदा ओठीं
खऱ्या-खोट्याचा कधिं न विधिनिषेध
धरुन, केला कटु वचें मर्म-भेद !

हवा दावाया स्वाभिमान जेथें
पुढें केलें मुख दीनपणें तेथें
असें दूषित जें कैक कलङ्कांनीं
नव्हें चुम्बाया योग्य निर्मलांनीं

साधुशीला, प्रभुतुल्य उदारा, तूं
मनीं धरिसि न हा भेद-भाव-किन्तू
शरम माझी मजलाच मात्र वाटे
विटाळावें मी केंवि या मुखातें ?

* * *

येच अथवा ये बाल्देवराया !
काय दवडूं हा पर्वकाल वाया ?
स्वेच्छया तूं सजलास चुम्बनास
कलङ्कांचा मम कराया निरास

अरे पापांनो, भुतांनो, पळा रे !
पहा मोक्षाचीं मला खुलीं दारें !

१५-११-१९३३

## ८. झाल्यां तिन्हिसाञ्जा

[ जाति—अवनी ]

अजुनि कसे येती ना परधान्या राजा ?
किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हिसाञ्जा !

उशिर होइ काढाया गाईंच्या धारा
शालु हिरा कालवडी देती हुङ्कारा
टवकारिति कान जरी वाजे दरवाजा
किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हिसाञ्जा !

वाट तरी सरळ कुठें पान्दींतिल सारी ?
त्यांतुनि तर आज रात्र अन्धारी भारी !
आणि बैल कसल्याही बुजती आवाजा
किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हिसाञ्जा !

'जेवणार मी पुढ्यांत' घाली मधु रुञ्जी
झोपेनें पेङ्गुळली तरि न निजे मञ्जी
आणि किती कराति आंत-बाहेरी ये-जा
किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हिसाञ्जा !

निवल्यावर हुरड्याच्या उसळीस न गोडी
लवकर का सोडिती न मोट तरी थोडी
अधिकाधिक खालीं-वर होइ जीव माझा
किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हिसाञ्जा !

गुरगुरला तो पिसाळ काल जरा कांहीं
म्हणती त्या मेल्याला काळिज कीं नाहीं !
परि पाठीराखी ती आहे अष्टभुजा
किरकिरती रातकिडे, झाल्या तिन्हिसाञ्जा !

१६-४-३३

## ९. दैवतें माय-तात

[ जाति–दिण्डी ]

तुम्ही होतां मज पूज्य पूर्वकाळीं
नाहिं आजहि ती पूज्यता निमाली
जधीं तुमचें देहावसान झालें
लोचनांचीं झिरपलीं आलवालें

जन्मदात्यांच्या दुक्ख वियोगाचें
पालकांच्या वात्सल्य-समाप्तीचें
आणि जगतांतिल एकलेपणाचें
किती दुबळया दाखवूं वदुनि वाचे !

मास-वरुषांच्या परी अन्तरानें—
नव्हे,—काळाच्या गार फुङ्करानें
दाह विरहाचा शमुनि अन्तरींचा
झरा नयनीं आटला आसवांचा

आणि आतां थाटल्या प्रपञ्चांत
अहो झालों आम्हीच माय-तात !
माय-तातांच्या ह्याच भूमिकांनीं
दिली तुमची थोरवी जाणवोनी

पांखरांची किलबील दीनवाणी
बघुनि भंवतीं, हें हृदय होइ पाणी.
किडा-मुङ्गीची वाण नेहमींची !
क्षुधाव्याकुल तोषवूं केंवि चोंची !

थिव्या अमुच्या पङ्खांत ऊब कोठें ?
प्राण चिमण्यांचा लोचनांत गोठे !
आणि कळतें सोसतां ताण हाल
किती आम्हांस्तव कष्टला असाल !

गिरिशृगांना जेविं मेघमाला
तुम्हीं पोटींशीं घेतलें अम्हांला
जेविं दिग्गज ह्या वसुन्धरेसाठीं
तुम्ही अमुच्या राहिला पुढें-पाठीं.

कळा वृश्चिकदंशशा साहुनीया
अंम्हां दिधली शैशवीं अङ्कशय्या
झोप बाळांची पावुं नये नाश
म्हणुनि अपुले रोधिले तुम्हीं श्वास.

दीप तेवावा जेविं अहोरात्र
मनें निरलस जागला श्रान्तगात्र
मानहानी पतकरुनि रोष लोकीं
तुम्हीं केली नित पाठराखणी कीं.

शिळें-पाकें सेवून सणावारीं
जुनें-पानें लेवून घरीं दारीं
सदा पुरवावें गोड धड मुलांना
असे अवघड संसार, यज्ञ जाणा.

आज आचरतां तोच यज्ञ—धर्म
थोरवीचें आपुल्या कळे मर्म
आणि येति न जरि आंसु लोचनांत
मना झालीं दैवतें माय-तात.

२-९-१९३५

## १०. झोपलेला बालक पाहून

[ सुनीत—शा. विक्रीडित ]

हा जागा असतां भयंकर चढे संताप माझे मनीं
दाटे कौतुक आणि गाढ ममता झोपेंत हा पाहुनी
'आहे हा पुरुषी स्वभावच असा' ऐसें कसें बोलतां ?
दावी रीति अशीच, घ्या बघुनिया, ही जन्मदात्री स्वतां.

"ह्याचे खेळ विचित्र ! हट्ट भलते; तैसे उपद्‌व्याप ते !
भावंडांसमवेत ना पळ जुळे ! कांहीं न कैसें पटे ?
देई वस्तु कसा मुळीं न टिकुनी ! भंडावलें ! बेरड !"
हा जागा असता अशी करितसे जी सारखी ओरड

ती ह्याची जननी, परंतु बघतां ह्यातें असा झोपला
वात्सल्यें कुरवाळते वरिवरी पाहून तोंडावळा.
"माझें बाळ गुणी किती ! उगिच मी कातावत्यें बोलत्यें !"
ऐसें बोलत रुद्ध—कंठ, टिपते ओलावले नेत्र ते.

आहे न्यायच हा ! जिवंतपणिंची टीकाहि ज्याची कृती
येतां त्या चिर काळ—झोप, सगळे गातात त्याची स्तुती.

७-९-४८

## ११. घर

[ जाति–उद्धव ]
अन्तरा व मेळ 'नृपममतें'तील

" लइ मानस अमुचा, द्यावी आपल्या घरीं ही पोर
पर शङ्का येउन कांहीं घेतें हें मन माघार !
पोरिला हौस मोल्यांची ती तुम्ही कशी पुरवाल ?
हा हेत पडावी कीं ती ज्या घरीं माणकं लाल.
बोलतों
असूं द्या माफि
करा दिलसाफि
असावें चोख
व्यवहार तरी बिनधोक ! "

" ठेवतां न पोटीं किन्तू पुसलेंत, लई आवडलें !
धनदौलत घ्या देखून कांहींच नाहिं लपलेलें.
पडवीला कणगी पोतीं मोतीं त्यांमधि बिनमोल
दावणीस गायी बैल त्ये अम्हां हिरे अन् लाल.
दरसाल
पिकें येतात
खाण शेतांत
तीच सोन्याची "—
बसलीच गांठ जन्माची.

१२-६-२८

## १२. गृहिणी मी; नच देवी

[ जाति–इंदुमुखी ]

दूर सरा, सुखवुं नका, रिझवुं नका मज, सखया !
वाढविते माझ्यांतिल दुबळेपण तव माया
विकसाया वेलीवर फूल हवें ना सहजीं ?
तरि उनांत पावसांत डोलूं द्या कलिका जी.

दाखवितां कळकळ जी सुखमय कां ती मजला ?
होइन या कळकळिनें अधिकाधिक मी अबला.
अबला नच, तुल्यबला होऊं द्या मजलागीं
संसारीं समसमान दोघांची जरि भागी.

आश्रयेंचि शोभतसे कविता, लतिका, वनिता
छे, शोभा गणतां जी ती तर कीं दुर्बलता.
शोभा कां वागवुनी दुर्बलास कटि–खान्दीं ?
आश्रित मी नच लतिका, अङ्गभूत मी फान्दी

तुमच्या इतुकेंचि मला वाहूं दे शिरिं ओझें
तनु होवो घर्मजलें थयथयतें कारंजें
बिंदि–बिजवरा न देइ घामाहुनि कधिं शोभा
माय दत्तकावरी न तनयाहुनि धरि लोभा.

प्रेमानें घास तुम्हीं मज द्यावा मीं घ्यावा
प्रेमाचा खेळ काय हक्कचि मीं मानावा ?
जोजवितां कां मज ह्या थाटुनिया सुखसोयी ?
कां जीवन–सङ्गीता चाल एक अंगाई ?

झगडाया कष्टांशीं पदर मला खोवूं द्या
विघ्नांच्या नजरेशीं नजर मला भिडवूं द्या
घ्या करुनी मज तुमच्याइतुकी बल–गुणशाली
मज पांगुळगाड्याविण चालूं द्या निज चाली

हा प्रपञ्च दोघांचा; समायीक ही शेती—
दो हातीं कां मग हो !—पिकवूं या चौ हातीं.
थापिन मी भाकरीहि, चालवीन आणि विळा
वाहिन शिरिं घागरीहि, तेंवि मोट वा शिवळा.

कांच-बाहुलीसमान जपणें कां प्रीत तरी ?
आपुलिया सारखेंच करणें ही प्रीत खरी !
मज अपुल्यासारखीच करुनी घ्या श्रमजीवी
गेह नव्हे देव्हारा; गृहिणी मी, नच देवी.

घरकुलास दोघांच्या कष्टांच्या फुलमाळा
बांधाया येतिल तरि तोच खरा सोहाळा
त्यांत शिळोप्यास बसूं बोलत मग गुजगोष्टी
आणि त्यांतल्याहि कांहिं अडखळल्या जर ओष्ठीं
कळवाया त्या मजला वाटल्यास कुरवाळा
प्रीत तीच रिझविल; नच निगराणी, नच चाळा.

२४।२८-८-४४

## . १३ . गुलामाचें गाऱ्हाणें

[ वृत्त—श्यामला ]

जूं बैसलें मानेवरी चाबूक हा पाठीवरी
ह्या कर्दमीं मार्गावरी चौखूर धावावें परि
हाकावया जो बैसला सत्तामदें तो झिङ्गला
माया-दयेची आर्द्रता नाहीं तयाच्या अन्तरीं

मागें रथामाजीं धनी थुङ्की तयाची झेलुनी
त्वेषें लगामा खेचुनी आसूड ने खालीं वरी
धोण्ड्यावरी ठेचाळतां खाचेंत पायीं मोडता
उष्वीवरी सन्थावतां ते कोरडे अङ्गावरी

विघ्नामधोनी वांचवा कर्तृत्व सारें दाखवा
या हाकणाराच्या नसे पर्वा तयाची अन्तरीं
त्या बक्षिसाच्या पोतड्या हासून मोतद्दार घे
माझ्या तनूच्या चिन्धड्या कोणीहि पाहे ना परि

धावूं किती रे मालका ? होसी दयेला पारखा
किंवा तुझी इच्छाच का— जावें फुटोनी म्यां उरीं ?

१-६-२३

## . १४ . जग–रहाटी

[ स्मर छन्द ]

जगा ! तुझी सारी तऱ्हा सदा उफराटी !

एक तरी बागेंतील
फूल कौतुकें देशील
बाळगिली आशा फोल
अतां पुष्पराशिमाजीं बुडे मात्र ताटी !

आपुल्याच जातां पायीं
पाडियलें ठायीं ठायीं;
केऱ्हढी ही आतां घाई
चालविती घाया खान्दा; मिरविती हाटीं.

साद कुठें येईल का
ह्याच अपेक्षेनें एका
तुडविलें तिन्ही लोकां
मिठ्या कलेवरा घाया अतां आप्तदाटी.

फुकटचा शब्द गोड
बोलला न कोणी धड
उठविली निन्दा-झोड
स्मशान हें निनादतें अतां स्तुति-पाठीं.

हयातींत आगडोम्ब
विझविण्या एक थेम्ब
मिळाला न; आतां कुम्भ—
किती रिकामे हे होती तिळाञ्जलीसाठीं

उभाविला स्नेह—गाथा
पाचोळाच आला हातां
खिळे-ठोक झाली माथां
अस्थिवरी देवालयें अतां नदीकांठीं.

मिळावया ऊब कोठें
झिजवितां उम्बरठे
दार बन्द जेथें तेथें;
धूपारती शेजारती अतां दिनरातीं !

सतावून यावज्जीव
ओलाण्डतां आतां शीव
दाखविती प्रेम-भाव
परिमार्जनाची धन्य तुझी ही रहाटी !

२४-६-१९३३

## १५. नसे जग सर्वस्वीं अनुदार

नसे जग सर्वस्वीं अनुदार !
सदाकदा कां करिसि तयावर
शापांचा भडिमार ? ॥ नसे जग० ॥

टपुनी असला जरि विहगावर
वरुनि ससाणा, खालुनिया शर,
डसुनि सर्प पारध्यास, त्याच्या
शरें ससाणा ठार ! ॥ नसे जग० ॥

आग भडकली असेल आंतुन
प्रखर पसरलें सभोंवतीं रण
छाया करुनी फणीन्द्र शीर्षीं
घाली फुङ्कर गार ॥ नसे जग० ॥

तनू जाहली रोगवसाहत
दिनानुदिन दुर्दैवशरें हत
वरुनि तयासच कुणी सेविका
ओपि दयामृतधार ॥ नसे जग० ॥

ओकिति तोफा आयस-गोळे
तटबन्दी तों शिरीं कोसळे
कोसळणाऱ्या त्याच शिला परि
झाल्या छत्राकार ॥ नसे जग० ॥

रन्ध्रोरन्ध्रीं वैर सळसळे
तोंडी लचके जिव्हा डोळे
दुष्मन–दुहितान्तरीं स्फुरे परि
सुहृद्भाव अनिवार ॥ नसे जग० ॥

कसलें नातें, देणें–घेणें ?
अभावरूपी अवघें नाणें !
तरिहि उदारधि उभा पाठिशीं
हा तुज साक्षात्कार ! ॥ नसे जग० ॥

तरि चरफडसी कुढसी कां रे
वल्हव नौका धीरें धीरें
तुफान लाटा देतिल वाटा
तुजला व्हाया पार ॥ नसे जग० ॥

४-१०-३९

## १६. लिलांव

[ जाति–दिंडी ]

कैक वर्षे झुंजून निराशेशीं
काळ एकाकी कण्ठिला उपाशी
गरीबाचा संसार जप्त झाला
आणि बाजारीं लिलावास आला

आणि सरकारी सांगुनी सवाल
ओरडाया तो लागला दलाल
जमा वाटेचे वाटसरू झाले
म्हणत 'कोणाचें निघालें दिवाळें'?

अधोवदना तों कानशिलें हातीं
धरुन बसलेली येइ दिसुन मूर्ति
मुखीं गाम्भीर्यासवें खिन्नता ती
करी सूचित जखडल्या जिवा तातीं

घेत एकामागून एक वस्त
वदे बेलिफ 'चालली लई सस्त'
वस्तु जीच्या भोंवतीं भावसिन्धू
कुणी लागे ती त्याज्य गणुनि निन्दू

जिला जपलें नैराश्यवारणार्थ
कुणी घेई ती गणुनि कःपदार्थ !

सुधा स्रवली जीवनाधार झाली
तिचे धिण्डवडे निघुन हो टवाळी !

वास देव्हाऱ्यामधें करि सदा जी
हाय, पडली ती पायदळीं आजी !
भुवनमोलाची स्मृती जीसभोंतीं
मातिमोलानें भाव तिचे होती !

असें पाडूं लागलें विभव त्याचें;
उदक सोडी तो वरी आसवांचें.
असा सारा संसार फुकुन टाकी
आणि उरलें स्मृतिचिन्ह एक बाकी:—

भुवनगोलावरि मूर्ति चारुगात्रा
तन्तुवाद्या वाजवी अन्धनेत्रा.
मूर्तिकाराची कला मूर्तिमन्त
लिलावाला ती निघे ! हन्त ! हन्त !

दलालानें उचलितां लिलावाला
हात गमलें घातला काळजाला
तिची कैशी लागेल वासलात
तिला घेइल अपवित्र कोण हात !

तिचा देखुनिया दैवदुर्विलास
बसे दाटुन त्याचिया गळां फास
दाम कोणी बोलतां निन्द्य लोकीं
गमे लचके हृदयिंचे तोडितो कीं !

तोंच धवलाम्बरधारिणी कुलीना
इन्दु अस्तोन्मुख तेंवि दैवलीना
कुणी प्रौढा अवतीर्ण हो समोर
करी सौदा होऊन तीन वार.

नेत्र विस्फारुन आणि मूढ चित्तें
कर्जबाजारी दृश्य पाहतां तें
बघुन मूर्ती पावली स्व-स्थळाला
हर्ष-शोकाचा तीव्र ये उमाळा.

आणि भिडला तो वार अन्तराला !
प्राण गेला भेदून अन्तराळा ! !

२६-९-२७

## १७. सावध! सावध!

[ मुक्त छंद ]

मला बुडविलें ह्या कृपावन्तांनीं
    आपुल्या औदार्यानें.
काय मीं ह्यांचें मारिलें होतें न कळे घोडें
    म्हणुन मला केला पांगळा !
श्रावणामधील जलदांसारखी
    ही ह्यांची खैरात
    करी माझा घात.
झगडाया मज नुरली वासना
वासनेमागून जातसे त्राण.

होतों मी नादांत
माझिया कैफांत
कांहीं बरळत.
उतरूं नये ती माझी धुंदी
म्हणून पुरवी हा मज चंदी.
चंदीचा तो माज नव्हे परि कैफ.
    कैफ तोच खरा रणझुंजाराचा
    कैफ तोच खरा क्षुब्ध सागराचा
    कैफ तोच खरा मत्त मयूराचा
    विश्व विसरल्या सन्त-नर्तकाचा.

एकदां नाचलों बेभानपणें
गवती तुरे, रानटी फुलें
लेवून नाचऱ्या झऱ्याच्या कांठीं.
तदा उदाराधि रसिकवरानें
उद्यानामधील आपुल्या महालीं
आदरानें माझी स्थापना केली
आणि पाचु-हिरे—
मोतियांचे तुरे
खोवियेले भावें माझिया मन्दिलीं.
अरेरे ! बसलों तेव्हांपासून
नर्तनकलेस माझिया मुकून !

काय शार्दूलांचें पाहतां क्रीडित
लोखंडी गजांच्या उंच सांपळ्यांत ?
भकाळ पोटाची रिकामी पोतडी
लोंबतां, पडते नेभळीच उडी !

चला डोंगराच्या गव्हरांत गर्द
तिथें शिलाखंडीं सुस्तावला जर्द
पञ्चानन जर आढळला कोणी
पाहा क्रीडेसाठीं तया डिवचोनी !

मर्दानी क्रीडांचा राया, तूं शौकीन !
झुंझार पाळिसी रतीब लावून.

झुंज ते करतीं नकली दिखाऊ;
झुंज करतील काय ऐदखाऊ ?

घेई रोमरोमीं अहंकार पेट
घेतात संग्रामीं ऐसे जेव्हां भेट
खुराक, वजन किंवा कृतज्ञता—
शुद्ध हिशेबाची असते कुणास ?
जीवितसर्वस्व लाविती पणास !

फिटतें तेधवां डोळ्यांचें पारणें;
पाहून होतात शौर्याचीं स्फुरणें.

अगा कृपावन्ता, उदार रसिका,
भुलीनें करसी केव्हढ्या ह्या चुका !

शौर्य – भक्ति – नृत्य – स्फूर्ति
नव्हेत बाहुलीं हीं कळसूत्री.

भावना मानिसी खेळणें सुन्दर ?
पूर्वनिश्चित कीं घड्याळ—गजर ?

अगा भागवता, सावध, सावध !
मठ आणि गादी
ना स्वीकारी कधीं.

वसाहती वेगें कारिती गादींत
रुधिर-पिपासु ढेकूण पिसवा.

जमतो मठाच्या तेंवि ओवरींत
भोंदु नि आळशी बैराग्यांचा थवा.

देखत-देखतां मठ आणि पन्थ
होतात—-हा हन्त !—
मोक्ष-दलालांची उतार-पेठ !

अगा भागवता, सावध ! सावध !
स्वीकारूं नकोस ऐसा आत्मवध !

१८-८-४५

## १८. करदा

[ सुनीत–शा. विक्रीडित ]

आधीं भाजुनि काढिलें मज पुरें, मागाहुनी नाङ्गर—
सर्वस्वावर माझिया फिरविला, केलें मला जर्जर.
धान्यें त्यावर फेकिलीं–परि भुकेसाठीं न तीं माझिया—
माझी सद्‌गुणसम्पदाच उलटी सारी लुबाडावया.

कांहीं दाठरता धरून बसला तो माळ त्या बाजुला
लावायास सुरुङ्ग, खोल खणुनी, कोणी सजे त्याजला.
त्याच्या देइल चिन्धड्या उडवुनी आणावया मार्दव
' हें सारें तव उन्नतीस्तव ' वरी ही सारवा-सारव.

व्योमीं मेघहि हे जमोन करिती शीताम्बुचें सिञ्चन
ही माझ्यावरतीं दया न, करिती त्या कार्षिकाची धन
होतां विन्मुख मेघ हे, पुनरपी माझ्याच पोटांतलें
पाणी काढुनि, शिम्पुनी, पिकवुनी घेतोच बीं आपुलें

' रत्नाढ्या ' नि ' सुवर्णभू ' स्तुतिपदीं गातां मुखीं गौरव
घेई स्वत्व मदीय मात्र पुरतें शोषून हा मानव

१६-९-३५

## १९. हा बालक बसला कागद टरकावीत

[ जाति–भूपतिवैभव ]

हा बालक बसला कागद टरकावीत !
ते कोरे किंवा त्यांवर लिहिलें गीत,
कीं नयनमनोहर रंगविलें गोपूर,
कंचनी काय कीं झणकारित नूपूर,
हा विचार नाहीं; नाहीं म्हणुनि फिकीर.
करण्यांत चिटोऱ्या रमला कारागीर.

ही रम्या नगरी साम्राज्याची भूषा
ही विश्वमोहिनी काय ऊर्वशी योषा
हीं लेणीं अथवा सुंदर ताजमहाल
करि विचार असला कां विध्वंसक काळ ?
तो काळपुरुष लेवुनी रूप वेल्हाळ
निर्विकार बसला लावित काय निकाल
लागेल तयाच्या जी जी वस्तू हातीं !
—ही आज कागदांवरती वळली दृष्टी.

कोपुनी तयाची म्हणते माय ‘ खट्याळा
हा चालविला रे काय विनाशक चाळा ? ’

परि मला वाटतें सांगावें जननीला
ही नको निखंदूं तव छकुल्याची लीला.

कागदांवरी ह्या लिहिलीं जातिल गाणीं
परि करिल कंठगत भावें कां तीं कोणीं ?
जरि कुणी ह्यावरी चटोर लिहिलें कांहीं
चघळतील वात्रट मात्र तया लवलाही.
हा मिळेल कोणा जरी सावकारास
होईल खास हा ऋणकोला गळफास.
लागेल हा जरी मुत्सद्दयांच्या हातीं
ते करार ऐसे करतिल ह्याचेवरती
कीं उडेल त्यांच्यामधुनि अचानक भडका
जो ग्रहगोलांना देइल धडका धडका.
जरि कुणी ह्यावरी विश्वशांतिपाठास
कोरिलें ओतुनी पुण्य, काय विश्वास—
कीं पुण्याई ती धूर्त कुणी मुत्सद्दी
ठरवितील हातोहात मामुली रद्दी.

त्यापेक्षां निरुपद्रवी खेळ हा नच कां ?
चालुं दे बालका, नको ऐकुं ह्या यमकां.

२२-११-४७

## २०. युगन्धरांचें पालुपद

जमेच ना, घडेच ना
बनेच ना, पटेच ना
घ्या तर हातीं आतां बंदुक
चढवा पट्टे उभे आडवे
पिंड्यांभंवतीं
कमरेभंवतीं
छातीवरती.
शिका, चला व्हा कडवे शूर !

घडी बसाया हवी जगाची
नवीन सुंदर शांत निरामय.
उरस्फोड कां थोडी केली ?
सिन्धु आटले किति शाईचे !
बोरू मेरू-मन्दारांचे
झिजले, गेले तासुन चिंबुन !
फेसाहि आला ओठांभंवतीं !
पण—
जमेच ना, घडेच ना
बनेच ना, पटेच ना !

उपाय उरला एकच—बंदुक !
काडतुसांची तुडुंब संदुक

खांद्यावरती

पाठीवरती

छातीवरती

चढवुन, निधड्या छातीचे व्हा.

निधडी छाती ?—

—भ्याडपणा हा !

अहो, बंदुका रोखुन धरणें

हुकुमासरशी चाप ओढणें

किंवा वरुनी आग ओतणें

हीं ?—

नामर्दांची जमवाजमवी !

भ्यांडपणाची लपवालपवी !

स्वतां पराजित, दुजांस शिकवी—

" शस्त्रें म्हणजे वीरभूषणें

रणांत मरणें म्हणजे जगणें

आवेशाचें गा हें गाणें

आणि ठरूं या जंगबहादुर ! "

—शुद्ध ढोंग हें

एकच यामधिं खरा अर्थ पण—

शूर व्हायचें जमेच ना !

जमेच ना, घडेच ना

कळेच ना, पटेच ना !

हतबुद्धांना गतीच कांहीं

मरण्यावांचुनि उरली नाहीं !

चुकांमागुनी चुका जाहल्या.
एक एक त्या पुसून टाकत
हवें जावया उगमापाशीं.
‘अगा, सुईच्या अग्रावरती
बसणें जितुकी शक्य धरित्री
मिळेल तुज तितुकीहि न परती’
—याहि चुकीच्या
चला शक्य तर जाऊं मागें.
जो तो अगदीं हेंच सांगतो, हेंच घोकतो.
चुका परन्तू भुतांसारख्या
भेवडाविती
दांत विचकती
प्रत्येकाप्रति.
चुकाच त्या कीं दाहक गोळे
धरावया चिमटींत तयांना
उचलुन बुडवायास सागरीं
कुणास छाती ? कुठें तयारी ?
उमे फिरवुनी पाठी सारे !

अहो, निघाला शिष्टाईला
अवतारी परमात्मा साक्षात.
फलश्रुती पण ?—
जमेच ना, घडेच ना
बनेच ना, पटेच ना.

म्हणुनि निघाले जाहिरनामे—
“पायावर जे उभे राहती
कवायतीला ते या पुढती”
कवायतींतिल परी बुटांच्या
एकमुखानें वदती टाचा
त्यांची वाचा
ऐका, ऐका, लिहा नि वाचा—
“ नव्या जगाची घडी मनोहर
बसेच ना, जमेच ना
घडेचि ना, पटेच ना ”

निरोप देतांना मातांचीं
विदीर्ण हृदयें ठिबक-ठिबकती
थारोळीं रक्ताचीं जमतीं
घरीं नि समरीं नद्या वाहती
वाहुनि सुकतीं, फिरुन वाहतीं
आणि वाहतां गाणें गाती
ताल जयाला पडघम धरती!
शतकें गेलीं !
युगेंहि गेलीं ! !
परन्तु त्यांचें एक पालुपद—
जमेच ना, बनेच ना,
घडेच ना, पटेच ना !

२-११-४४

## २१. गोलघुमटांत

[ मुनीत—शा. वि. ]

जैसा एकच टाकिला जरि खडा त्या सन्थ पाण्यावरी
एकामागुनि एक कैक वलयें उत्पन्न होतीं तरी
तैसा एकच शब्द गोलघुमटामाजी जरी बोलसी
त्याचे उद्भवती निनाद किति हे ! आश्चर्य तूं मानिसी.

का आश्चर्य तुला चमत्कृतिमया कारागिरीचेंच ह्या ?
देहाच्या दुनियेमधेंहि तसली कारागिरी माझिया.
बाले ! तो प्रिय शब्द एकच तुवां उच्चारिला जेधवां
माचित्तीं घुमुनी अनन्त पटिंनीं सामावला तेधवां.

जाती येथिल हे निनाद विलया अल्पावकाशें तरी
बोलाचे श्रवतों निनाद तुझिया हा काल मी अन्तरीं
येई ऐकुं इथें, जरी पुसटही टोकास त्या बोलतां.
मौनाचेहि तुझ्या निनाद घुमती, ही मन्मनीं सूक्ष्मता.

आलें काय न हें तुझ्या अनुभवा आश्चर्य ? कारागिरी ?
त्याची आकृति काढिली घुमट हा बान्धून कोणी तरी !

२३-७-१९३२

# २२. गुन्हेगारीण

[ स्मर छंद ]

कुणा तुझ्या वैभवाचा पडेल ना मोह ?
नाचतात मन्द वीची
कान्ति हिऱ्या-मोतीयांची
साक्ष कवि-हृदयाची
उडी कां न घ्यावी ऐसा पाहतांच डोह ?
तुझी ऐकतांच तान
साथ द्याया तन-मन
उचम्बळे नादावून
ऐसे तुझ्या सङ्गीताचे आरोहावरोह !
शोभेशी न तुला जरी
लोटुं नको राया दुरी
परिसाची तूझी थोरी
होईन मी काञ्चनाची जरी असे लोह !
दिपले नि झाले अन्ध
लाथाडिले सारे बन्ध
घेतलासे तुझा छन्द
कशासाठीं आणिकाचा हवा उहापोह ?
तुजवरी प्रेम केलें
आणि गुन्हेगार झालें
परि तुझ्या कृपाबळें
शैलशिरीं सौभाग्याच्या नेईल हा द्रोह !

१९३१

## २३. न्याहारीचें गाणें

[ मुद्रिकेंतील समपङ्क्ति सारखी ]

न्यारिचा वकुत व्हॊईल मैतरिणी बिगिबिगि चाल
नाङ्गूर-सुटीच्या आंत पोंचाया होवं ततं
सोडितिल हात बैलांला धुण्डील नदर कोनाला ?

नदरे न पडन् मी जरी
जाईल मर्जि ग तरी
उरिं रुतऽल माझ्या सुरी

नग नग गमावूं येळ मैतरणी बिगिबिगि चाल

लइ वाढुळ जुपि झाल्याली असत्याल समदिं शिणल्यालीं
शिण जाइल न्यारि करून अन् साङ्ग कुना देखुन
त्ये खुलं तोण्ड घामानं भरघोसाहि कणसाहुन

पाहिलं जरी रोज मी
तरि हौस न होई कमी
फिराफिरुन पगायास मी

व्होतसें मनिं उतायीळ मैतरणी बिगिबिगि चाल

७-९-२५

## २४. येसि कशाला दारीं?

[ जाति–रक्षा ]

येसि कशाला दारीं ऐसा ऐन दुपारीं ?
भीक हवी जरि
झोळि रिती परि
दिसते का तरि सारी ? रीत दिसे तव न्यारी !
देतां भाकर
करिसि पुढें कर
पडते गळुन बिचारी ! कसल्या भ्रमासि विचारीं ?
जासी येथुन
जासि तडक पण—
कां नगराबाहेरी ? शिरासि न कां शेजारीं ?
खेप न चुकते
वेळ न टळते
नयनीं नच लाचारी नवल गमे हें भारी !
एकच गुणगुण—
'तुजविण जीवन
होइ सुधाहि:विषारी'—गासी, हृदयविदारी.
बघसी इतुका
मज रोखुन का ?
का तूं भृङ्ग ? चितारी ? छे, दिसतोस शिकारी !

मिटलें पङ्कज
गेलें सावज
आतां फोल हुशारी, वेषान्तर, रहदारी !

हुकलें खलबत !
नेई गलबत
पर-मुलुखा व्यापारीं; श्रमसी व्यर्थ किनारीं !

येउं नको रे
माजवि नच रे
खळबळ हृत्कासारीं, या सुरळित संसारीं

राखेचे थर
बसुनि जिच्यावर
ठिणगी जी पिचणारी फुङ्कर तिजसि न मारी

भीक घाल मज
दावि न मुख निज
घोर अनर्थ निवारीं. मी दुबळी अविचारी !

३-४-१९३३.

## . २५ . पत्रिकाहवन

[ सुनीत–शा. विक्रीडित ]

गेहीं निर्जनता, भयाण रजनीसाम्राज्य विश्वावरी.
भालू भीषण साद देति मधुनी रानांत शेजारच्या.
अग्नी पेटवुनी तदा पसरलें त्याच्यापुढें आसन,
घालूं नाचहि लागल्या उसळुनी ज्वाळा वरी हावऱ्या.

वक्षीं ठेवुन वाम हस्त, उजव्या हातांतली आहुती
मन्त्रोच्चार करून ऋत्विज जसा अग्नीमधें अर्पितो
माझें वक्ष धडाधडा उडत तें डाव्या करीं दाबुन
देतों आहुति एक एक तिचिया या प्रेमपत्रांतली.

हा थण्डावत चालला अनल, जा जा अग्निनारायणा !
झालें, पार जळून राख बनलीं हीं स्मारकें प्रीतिचीं !
राखेच्या परि कागदावर दिसे सुस्पष्ट तीची सही
वायूनें उडवून तीहि दिधली ! हें सम्पलें नाटक !

खेळाची सुरवात आणि बघतां हा आजचा शेवट
पेटे अन्तरिं अग्निकुण्ड, जळतो त्याच्यामधें हृत्पट.

२-११-२३

## २६. सङ्क्रान्तिचा तो दिवस !

[ वसन्ततिलका ]

अद्यापि ते दिवस येति मदीय ध्यानीं
मज्जीवनांत भरली नवता जयांनीं.

सङ्क्रान्तिचा दिवस आठवतो तुला का ?—
त्वां जेधवां फुलविली मम भाग्य-राका.

घेऊन शुभ्र हलवा निज रौप्य-पात्रीं
आले अकल्पित तुझ्या सदनास रात्रीं
होते उभी, तुजपुढें हलवा करोनी
त्वां पाहिलें मजसि लोचन तैं भरोनी.

" का शुभ्रताच अवघी ? नच ह्यांत रङ्ग ?"
प्रश्नास उत्तर दिलें तव काय ? साङ्ग !
" ह्याच्यांत रङ्ग भरणें "—वदले हळूंच
" हें काम केवळ अतां तुमच्याकडेच ! "

टाकांत घेउनि तदा झणिं लाल शाई
" कोठें भरूं ? " म्हणुनि चालविलीस घाई.
मी तों मिटून नयनें तुझिया पुढारा
होतेच निश्चल तशीच उभी मयूरा !

तों स्पर्श शल्यसम, गार, मदीय भाळीं—
होतां, क्षणीं पुलकिता तनु ही जहाली.

शीर्षीं तुझ्या उधळिला हलवा समस्त.
बोलून ‘ बालिश ! ’ तुवां धरिलास हस्त.

ताराङ्गणासम तुझी गमलीच खोली
तीमाजि· तूं विलसलास हिमांशु-माली
होती सुगन्ध वितरीतहि रात-राणी
भाळावरील नव्हती सुकली निशाणी.

मज्जीवनामधिल ती रमणीय राका
सङ्क्रान्तिचा दिवस आठवतो तुला का ?

१४-३-१९३४

## २७. प्रेमाची दौलत

[ जाति–भूपतिवैभव ]

ही तुझीच वाकळ म्हणुनि मला कै प्यारी
पिर्तीची आवड समद्याहुनि रे न्यारी
झालींत लक्तरं तरीहि मजला गोड
पुरवितें पिर्त पाहिजेल त्याचं कोड ?
ही तुझीच थाळी म्हणुनि चाटते राया
मज लागिर झालं म्हणती आयाबाया
हा तुझाच पावा, मोरवेलिची काठी
झोपते घेउनी रोजच पोटीं–पाठीं
हें तुझ्या डोइचं जुनं जरी मुण्डासं
कुरवाळित बसत्यें, होतं माझं हासं
हें तुझ्या अङ्गचं जपुनि ठेविलं कुडतं
ही दौलत माझी – येडच त्याचं जडतं
माझिया कोण जो पोटीं, येइल
तो जवा बापई म्होरं, होइल
ह्यं घालुन त्याला पाहिन डोळं भरुनी
मग खुशाल तिरडी बान्धा माझी कोणी

१-९-२३

## २८. तूंच रमणी !

[ वृत्त : शिखरिणी ]

कशाला अव्यंग स्वरुप इतुकें लोक भजती ?
कुठें थोडी पावे उणिवहि पुढें गोड महती !

'मृगाक्षी' तूंतें मी म्हणुन हिणवूं काय हरिणें ?
तुझ्या नेत्रीं तैशीं फुलति म्हणुं का चंद्र–किरणें ?
उषा संध्या आणूं सखि तव कपोलीं उगिच का ?
तुझी नाहीं दंतावलि तुज गणाया रदनिका

तुळाया नाकाशीं मुळिंच नलगे चंपककळी
शशीच्या बिंबार्धा उगिच भिडवूं काय निटिलीं
कशासाठीं ओठीं हुडकुं तुझिया विद्रुम–गुणा ?
वृथा संबोधूं का 'कमलनयना ! पद्मवदना !'

स्तवाया रूपा का हवि तरि करायास तुलना ?
कशाला धुण्डाळा वन गगन खाणी उपवना ?

* * *

विना-वैशिष्यानें विलसत तुझें नाक असुनी
रुचें त्याचें मातें स्फुरण अथवा कम्पन मनीं
खऱ्या खोट्या रोषें मुरडि कधिं त्याच्या सुरकुत्या
कितीदां झाल्या गे मज चिडावित्या वा खुलवित्या.

उन्हातान्हामाजी अविरत जिनें कष्ट करणें
तिच्या गालीं पद्मासम कुठुन लाली बहरणें ?

जरी छाया, ग्वाही मिळताहि तिथें ताम्रपटशी
बगीच्यापेक्षां ती जमिन बरवी बावनकशी

तुझ्या कान्ते ! दन्तावलिमधिल तो एक तिरपा
दुजाचा गेला तो कधिं उडुन बारीक टवका
तयांच्या हें शोभेमधिल मज वैगुण्य खुपलें
खुपावें त्यांनीं,–तें सुखकर तसें सेव्य ठरलें

तुझ्या ओठांमाजी जरि न इतुका रेखिवपणा
जरी त्यांच्या ठायीं फिकटपण तें आणि करुणा
रुचे होतां त्यांची उकल कधिं संकोचाहि तसा
तृषार्ता ह्या तेथें विमल सलिलाचा भरंवसा

कपाळीं चिन्तेचे ध्वज सतत तूझ्या फडकती
कपाळीं कष्टांचे ढग सतत तूझ्या डंवरती
असो तें चिंचोळें, प्रिय मज तरी; फुंकर सखे
तया घालायाला, कवळुनि उरीं, मानस भुकें

तुझ्या काळ्या डोळ्यांभंवतिं वलयें काळसर तीं
कशीं केव्हां आलीं कुठुनि, मजला ज्ञात पुरतीं.
मृगाक्षी पद्माक्षी नसलिस तरी हींच वलयें
स्फुरे चुंबायाची म्हणुनि ह्रदयीं ओढ, सखये !

कितीही सौंदर्योद्धत झळकल्यीं मूर्ति भुवनीं
तुझ्या व्यंगानेंही मज सहचरी, तूंच रमणी !

२८-११-४१

## २९. ताजमहाल

[ सुनीत–शा. विक्रीडित ]

नाहीं सुन्दरता कुठें ? अणुअणू शोभे सबाह्यान्तर
पक्ष्यांचीं घरटीं, हिम, स्फटिक वा पुष्पें फळें सुन्दर
कोणी मातिंत कोरितो स्वसदना शङ्कूपरी कीटक
सृष्टी–शिल्पकलापटुत्व, जरि तें साधें, मनोवेधक.
जेथें शिल्पकलाच एकवटली, सौन्दर्यसीमा पुरी
तो हा ताजमहाल भारतहिरा कालिन्दितीरावरी
येते त्यास पहावयास जनता पांचींहि खण्डांतुनी
होते विस्मित, 'धन्य धन्य' निघती उद्गार तोण्डांतुनी.
शोभे ताम्बुस अम्बुजासम अहा अस्तोदयीं भानुच्या
चान्दीची प्रतिमाच कीं हिमगिरी कान्तीमधें इन्दुच्या
काळोखांत दिसेल अन्धुक जरा कीं देवदूतापरी
तो केव्हांहि, कसाहि, कोठुनि पहा; त्याची न कोणा सरी.

नाहीं तो जरि पाहिला, तरि तुझी प्रीती तशी मानितां
अन्तश्चक्षु नवी नवी अनुभवी सौख्यासवें चारुता.

२५-८-१९२२

## ३०. नौकाविहार

[ जाति–भरतखंड ]

सखे ग प्रशान्त किति यामिनी।
ही तशीच जलवाहिनी ॥ ध्रु० ॥

ही विशाळता कितितरी
तव उदार हृदयापरी
करुं विहार चल तीवरी ॥ सखे ग० ॥

किति अथाङ्ग जळ हें दिसे
तव अगाध अनुरागसें
मज जडे जयाचें पिसें ॥ सखे ग० ॥

तव मुखीं छटा नाचती
जळिं लहरि तशा धावती
तव मृदुता अनुकारिती ॥ सखे ग० ॥

गगनिंच्या सुधासिञ्चनीं
उमलली पहा मेदिनी
कुमुदिनी जणूं उपवनीं ॥ सखे ग० ॥

बघ नभांतल्या चान्दण्या
उतरल्या जळीं डुम्बण्या
गतसुखस्मृती जणुं मनीं ॥ सखे ग० ॥

चवथिच्या विधूसारखी
चिमुकली दिसे नाव, कीं
फिरुं बसून या पुष्पकीं ॥ सखे ग० ॥

चमकत्या तरङ्गासवें
ही डुलेल नौका जवें
जशि रसिकजनीं कञ्चनी ॥ सखे ग० ॥

जळ झुलेल जैं वायुनें
सुख मिळेल आन्दोलनें
जें दिलें अङ्कि आइनें ॥ सखे ग० ॥

तरुलता उभ्या दों तटीं
लवलवून डोकावती
अनुभवूं सुखें आज तीं ॥ सखे ग० ॥

विहरतो विधू उडुगणीं
सुख इथून मिळवूं क्षणीं
नभबिम्बित जळिं हिण्डुनी ॥ सखे ग० ॥

भववनांत तूं इन्दिरा
प्रगटलीस या पामरा
सुरपदास न्याया क्षणीं ॥ सखे ग० ॥

तव कोकिळकण्ठांतुनी
ऐकवी मला गौळणी
नच दुजा स्वर्ग याहुनी ॥ सखे ग० ॥

३१-१०-२५

## ३१. क्षुद्र जीवजन्तूस

[ स्मर छन्द ]

अगा जीवजन्तो ! येई कींव तुझी क्षुद्रा !
साठलेलें साण्ड-पाणी
त्यांत तुझी रास-न्हाणी
तुवां साङ्ग का रे कधीं पाहिलें समुद्रा ?

आरोहूनि लाटांवरी
विहरला दिगन्तरीं
तयालाच रत्नाकरातळीं शेज निद्रा

उडे उंच आकाशांत
व्याध तया विन्धितात
वीर-मृत्यु-भाग्य टोळा कोठुनी अभद्रा ?

वसे निवडुङ्गामाजी
घाणींत जो सदा राजी
शिकारी न शोधी त्यातें, धुण्डितो मृगेन्द्रा

गाजला जो शौर्यवन्त
तयालाच दिव्य अन्त
पतनींहि नक्षत्रांची प्रेक्षणीय मुद्रा

१२-२-१९३४

## ३२. सारङ्गीवाला

[ जाति—घोर रजनी ]

सारङ्गि सारखी तव वाजवुनी टाकी जन गुङ्गवुनी
घोर रजनी विकट हासे
वस्तुठायीं भूत भासे
परि सूर ऐकतां दूर जातसे काहुर मनिंचें पळुनी.

किरकिरे ही रात्र काळी
कीं गृहांच्या ताळमेळीं
वाचते जगाच्या लेख कपाळीं ठेवियले जे लिहुनी.

कटु निराशा माजलेली
नजर पुरती अन्ध झाली
अन्धार हराया दीपराग कीं बघसी तूं आळवुनी.

लागले हे दीप गगनीं
वादनाच्या मञ्जु गानीं
अन्धारसिन्धु मन्थुनी फेकिसी उडुरत्नें कीं गगनीं.

तीव्र समरीं जीविताच्या
फुटाति छाती ज्या जनांच्या
तूं धन्वन्तरि, तीं हृदयें देसी सङ्गीतीं सान्धवुनी.

प्रेम सरलें, शरिर कसलें
प्रेत बनलें; त्यास अपुलें
परि आयु सार्थकीं लावाया पथ देसी कीं दाखवुनी.

हें उपाशी मूल उठलें
माउलीचे अश्रु प्यालें
अङ्गाइ गावया तया हिण्डसी सारङ्गी वाजवुनी.

धूळ जीतें शेज झाली
येथ निजली ही हमाली
चैतन्य द्यावया तिला उद्यांस्तव अवतरसी दिव्य मुनी.

उदरभरणीं चोर उठले
देह गणिकांचेहि नटले
परि दिव्य भाव अन्तरीं त्यांचिया पालवसी कीं फिरुनी.

भङ्गलेल्या आत्महृदया
रोज फिरसी शान्तवाया
परि भग्नहृदय जीवांस मिळतसे विरङ्गुळा या गानीं.

कर कसेंही कर्म दिवसां
सूर रात्रीं घुमविं ऐसा
नेतील विमानांतुनी देव तुज आनन्दें निज भुवनीं.

१८-१-२४

# ३३. कसोटी

[ जाति–दिण्डी ]

खडा तेजस्वी गवसला तयाला
करुनि उलथा-पालथा पाहियेला
त्यांत अवलोकुनि विविध रङ्गलीला
येइ आनन्दोत्सवें तो घराला

दळण आईनें घातलें बघून
त्यांत दिधला तो हळुच सरकवून
' खडे मेल्या मिसळसी खोडसाळा '
निखन्दोनी, ती निवडि तो निराळा.

फुलवि उमलें मावशी चुलीपाशीं
बघुनि सुचली कल्पना तया खाशी
म्हणे ' लाहीवर विलसतील रङ्ग '
हाय ! पाण्यामधिं खडा परि अभङ्ग !

निराशेची तरि परतवून लाट
धरी परसाची खड्यासवें वाट
करुनि वाफा दूरच्या कोपऱ्यांत
रुजायाला खुपसला खडा त्यांत.

रोज नेमें घालून तया पाणी
कोम्भ येईना तरि कसा अजूनी

म्हणुन पाही उकरून मुई जेव्हां
खडा तेथें आला न दिसुनि तेव्हां.

उठुनि खुरप्यासह परत उभा राही
आपुल्याशीं पुटपुटत असें कांहीं
" पीठ होईना, फुलेना, रुजेना,
हवा होता तरि खडा असा कोणा !"

३०-७-३८

## शैवालानें आच्छादलेल्या
## ३४. विहिरीचें गाणें

[ जाति—शुभवदना ]

[ १ ]

हळु हळु हळु दिनमणि हा उदयाचलिं आला
फुलवाया जणुं माझ्या भाग्यपङ्कजाला
येइल तो शेतकरी
लाविल मग मोट वरी
नेइल मम जीवनांश पिकविण्या पिकाला
येतिलही किति गृहिणी
नेतिल जल घट भरुनी
निज चरणीं वाहुनिया देहिं वलयमाला
घेइल कुणि वरुनि उडी
देइल कुणि पोटिं दडी
लाडानें झटति मुलें जेविं माउलीला
कलशातें वसनातें
क्षाळतील जन येथें
भाग्य थोर !— करुं शकते विमल मालिनतेला
सकलांच्या व्यापारीं
ही सरेल नीळ दुरी
प्रतिबिम्बें आणतील भरति वैभवाला
हळु हळु हळु दिनमणि हा उदयाचलिं आला.

२७-२-१९३३.

शैवालानें आच्छादलेल्या

# ३५. विहिरीचें गाणें

[ जाति–स्नेहसागर ]

[ २ ]

शैवालानें मला टाकिलें व्यापुन पुरतेपणीं
गुदमरे जीवाहि त्या दडपणीं

बाहेर वाहते वाऱ्याची झुळझुळ
लागतां तयाची पुसट कधीं चाहुल
चलबिचल अन्तरीं करि मजला व्याकुल
परी सुटेना मिठी तयाची बसली जी जखडुनी
गुदमरे जीवाहि त्या दडपणीं !

कुणि घरा सखे जन येतां प्रेमादरें
फुटतात अन्तरीं उकळ्या, स्मित मोहरे
हें तितुक्यापुरतें पटल बाजुला सरे
वळतां त्यांची पाठ पुन्हां हें येई सरसावुनी
गुदमरे जीवहि त्या दडपणीं !

जें जया हवें तें जातो तो साधुनी
सेवेस सज्ज मी सकलांच्या खिदळुनी
खिदळतेंहि आपण हें मज अनुकारुनी
परी तयाची घोर उपाधी जाची मज निशिदिनीं
गुदमरे जीवाहि त्या दडपणीं

मी स्वतांच असुनी विमल जलाचा झरा
आमरण राहणें तृषाक्रान्त घाबरा
ही नीति निष्ठुरा तुझी दयासागरा
का न निखन्दूं तुला जोंवरी नरक असा जीवनीं
गुदमरे जीवाहिं त्या दडपणीं

५-७-१९३३.

## ३६. चन्द्रम्या

[ जाति–महात्मवती ]

चन्द्रम्या ! पाहसी काय नभांतुन खालीं ?
चालतां ठराविक रोज आपुल्या चालीं—
काय पाहसी खालीं ?

काढाया लागे तुज मेघांतुन वाट
क्षयभीति पुरवि तव उत्कर्षीताहि पाठ
आभास फक्त हे ! काय वेदना ह्यांत ?
पाजळीत फिरसि मशाली !

आमुच्या पहा रे पूर्व नि पश्चिम भागीं
कोसळतीं शहरें आणि भडकती आगी
तडफडतीं सडतीं प्रेतें जागोजागीं
जणुं धरा रौरवा व्याली !

स्फोटानें शकलें उडती अस्मानांत
पर्वता–एवढे उठति धुराचे लोट
तुजपर्यन्त न हे भिडती घोर अनर्थ
तव म्हणुनि मिजास खुशाली !

तूं करिसि सुधेची वृष्टी वरुनि उदण्ड
परि इथें विषारी रसायनें लोखण्ड
उकळत्या तयांच्या कढया पडति न थण्ड
गुणधर्मा कां ती मुकली ?

किंचाळति समरीं मरणोन्मुख विच्छिन्न
अश्राप कुटुम्बें वणवण फिरति विपन्न
ओषधी तुझी परि एकहि गुणसम्पन्न
त्यांची नच शमवि कहाली

ह्या वसुन्धरेच्या भंवतिं घालिसी पिंगा
तिज रिझवुं पाहसी प्रणय-रुंजिनें भृङ्गा
परि थण्डचि ?—बघुनी तिच्या विटंबिति अङ्गा
दिनरात धुरीण मवाली
चन्द्रम्या ! पाहसी काय नभांतुन खालीं ?

५।८-७-४२

## . ३७ . प्रतिमालेखन

[ जाति—स्नेहसागर ]

तूं तशीच राही उभी जराशीं भिन्तीशीं रेलुनी
घेउं दे प्रतिमा मज काढुनी.

तो किञ्चित निळसर शुभ्रपणा भिन्तिचा
करि हेवा जणुं कीं तुझ्या अङ्गकान्तिचा
हा मधुन लोम्बतो धवल पदर स्कन्धिचा
असा जुळुनि संयोग समसमा येइल काधिं कोठुनी
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

तूं उभी जराशी भिन्तीशीं रेलुनी
भर एका पायीं, दुजा जरा उचलुनीं
ती चन्द्रकोर बघ तशीच ताराङ्गणीं
किञ्चित कलती उभी राहिली जणुं तुज अनुकारुनी
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

नासिकीं तजेला, त्यांत मोरणी खुले
ते मृदुल लालसर कान किती कोवळे
त्यां बिल्वदलाकृति डूल हलत शोभले
प्रभेंत त्यांच्या अधिक रङ्गती कपोल ते आरुणी
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

चंद्रिका सुगन्धी देहीं तव जाहली
रत्नांस मृदुलता देहीं तव लाभली
द्रवरूप सुधा ती द्युतिरूपा पावली
अशा अलौकिक आश्चर्यांच्या रमतां सम्मेलनीं
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

तूं नससी भीरू नसशी वा उद्धता
ती विनयशीलता वाढवि तव चारुता
ते आयत लोचन करिती सुस्वागता
स्नेहीं तुझिया होइल जीवित उत्सव वा पर्वणी
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

किति परोपरींचे तरङ्ग उठती मनीं
परि कसे अचानक दावुं तुला बोलुनी
तरि अमान्य न करी एकच ही मागणी
तशीच राही उभी जराशी भिन्तीशीं रेलुनी
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

बघ शुक्र चान्दणी मङ्गळ तिजसङ्गतीं
परि अल्पावधिची असे तयांची युती
तैशीच भेटिची काय न अपुल्या गती
विरङ्गुळा परि मिळेल हृदया जीच्या आलोकनीं—
घेउं दे प्रतिमा मज काढुनी

१८-८-१९३३

## ३८. दिवङ्गताचें स्मारक

[ जाति–लवङ्गलता ]

सभा योजिली दिवङ्गताच्या पुण्यस्मरणासाठीं
सभामण्डपीं श्रोतृजनांची चिकार झाली दाटी

कितीकांस तरि हयातीमधीं ओळख त्याची नव्हती
महती पटते बहुतेकांना व्यक्ती मेल्यावरती. ४

वक्त्यांनींही व्यासपिठावर तशीच केली गर्दी
दिवङ्गताच्या स्तुतिपाठीं ते दिसून आले दर्दी

कुणी मृताचें कष्टाळूपण वानियलें भरपूर
[ गाजविलेलें तयें असावें वरिष्ठपण मग्रूर ]

तोण्ड भरूनहि कुणीं वानिलें त्याच्या औदार्यातें
[ न कळे त्यानें दिवङ्गता किति कसें बुडविलें होतें ]

कुणी तयाची प्रशंसिली बहु वृत्ती स्वागतशील
[ नित्याचा पाहुणा न कां तरि कृतज्ञता दावील ? ]

कुणी बोलला ‘ कधिं न कुणाचीं ऋणें ठेवि तो बाकी ’
[ असावाच तो धनको किंवा दुकानदारांपैकीं ]

कुणी म्हणाला ‘ होता तो हो लढवय्या झुंझार ’
[ अकुतोभय रिपु अतां स्तुतीसाहि घेतिल का माघार ? ]

कुणी तयाच्या प्रभा बुद्धिची अमर्याद वाखाणी
[ प्रतिस्पर्धि तो अतां न, उमटे विश्वासें ह्या वाणी ]

मित्र, हितैषी, पाठीराखा स्वतांस सम्बोधून
छळक तयाच्या जिवन्तपणिंचे घेती हात धुऊन.

अनन्य-साधारणता त्याची मुक्तकण्ठ गाऊन
कुणी कृपणपण टाकी अपुलें तेथें प्रक्षाळून

अहो, न ही उपरती जाहली देखुनि ती जनगङ्गा;
व्यासपिठाची रङ्गभूमि हो, आणि नाट्य ये रङ्गा.

आणिक हेंही स्वाभाविक कीं, स्वतांत ज्याची वाण
ते गुण दिसतां अन्यत्र, न कां यावें स्तुतिस उधाण ?

तशांत लोकीं व्यवहारहि हा म्हणती ज्ञाते कांहीं
' चितेसवें द्यायचा भडाग्नी हेव्यादाव्यांनाही '

निवापाञ्जली-समयीं ऐसा स्तुतीस आला पूर
दिवङ्गताचा आत्मा वरती झाला विस्मयचूर ३०

ह्यापरि हेलावला पाहुनी श्रोतृजनांचा भाव
उभे राहिले सभापती मग माण्डायास ठराव—

" अहो, दिवङ्गत –वर्य आपुले होते लोकीं —श्रेष्ठ
थोर समाजोद्धारक, त्यांचें अचाट तें धारिष्ट

अङ्गिकारल्या व्रतावरिल नच चळली त्यांची निष्ठा
ह्यातभर सोसल्या जाहल्या तिंतुक्या हाल-अपेष्टा

भूषण ते नच केवळ एका नगरीचे ज्ञातीचे
भूषण होते, सुपुत्र होते थोर मायभूमीचे !

पुण्यस्मरणीं आज जाणुनी कार्य तयांचें दिव्य
उभारिलें पाहिजेच आपण त्यांचें स्मारक भव्य !"

आवाहन हें होइल वायां कैसें पुण्यस्मरणीं ?
खिशांत भरभर हात घातले श्रद्धाळू श्रोत्यांनीं
वक्त्यांचेही सढळ आकडे आणि पटापट पडले

—दिवङ्गताच्या गेहीं तिकडे अश्रु टपाटप गळले !
कारण पुण्यस्मरणामाजी चूर मृताची कान्ता
करीत होती दोन लेकरांसवें मूक आकान्ता

दिवङ्गताचें तीहि आठवित होती जीवितकार्य
आणि त्यामुळें हाल-अपेष्टा झालेल्या अनिवार्य

आणि तयाच्या पश्चात् दैन्याहि आलेलें नाशिबास
पुण्यस्मरणीं पडेल कां मग खळ अश्रुस्खलनास !

टाळ्यांच्या गजरांत सभाजन कृतार्थ गेले गेहीं.
दिवङ्गताच्या गाति लेंकरां रातकिडे अङ्गाई. ५२

स्मारकनिधि लागला भराभर वाढायाला रोज
सभापतीचा तसाच होता समाजामधीं बोज

छे, चुकलों ! त्या दिवङ्गताची तशीच होती महती !
कर्तव्याची आणि समाजीं जागरूकता होती !

दिवङ्गताचे ऋणानुबन्धी होते गांवोगांव
यथाशक्ति ते व्यक्त आपुला करिती भक्तीभाव

श्रेय कमी नच त्या उत्साही स्वयंसेवकांनाहीं
दिवङ्गताची दयिता ज्यांनीं अहो वगळली नाहीं !

फाडाया पावती तयांनीं पुशिलें नांव तियेला
तोंच आंसवें अन्ध तियेच्या करिती लोचनयुगुला

नाद सोडुनी नांवाचा, ते मुकाट वळले परत
साङ्गत सुटले अनुभव सकलां हृदयस्पर्शी मात्र.

थेम्बें थेम्बें तलाव सांचे, कणाकणानें रास
स्मारकनिधि लागला तसा तो दरदिन वाढायास. ६६

आणि मुद्रणालयांत आला स्मारकनिधि-अहवाल
दिवङ्गताच्या दयितेची नच कुणास हालहवाल

करी मुद्रणालयांतलें ती काम आणुनी सदनीं
दिवङ्गताचें जगवी स्मारक पुत्रद्वय ती खपुनी

मिणमिणणारा दिवा, बाजुला बाळें दोन्ही निजलीं
अहवालाच्या फर्म्यांच्या ती घड्या सपासप घाली.

निधि स्मारकासाठीं जमला हजार वा किति लाख
काय वाचुनी ? तिच्या ललाटीं मृत आशांची राख ! ७४

दिवसामागुनि दिवस जाउनी पुण्यतिथी ये दुसरी
स्मारकमन्दिर उभारलेलें भव्य शोभवी नगरी

उद्घाटन व्हायचें तयाचें आज समारम्भानें
दिवङ्गताचें जमा चहाते झाले उत्साहानें.

“ स्मारकमन्दिर दिवङ्गताच्या स्मृतिवरती जणुं फूल
फुलापरिस हें परि न व्हायचें दुसऱ्या दिवशिं मलूल.

स्मारकमन्दिर --फूल रम्य हें चिरञ्जीव शोभेल
इतिहासामधिं दिवङ्गताचें नांव जसें नान्देल

दिवङ्गतानें जिणें वाहिलें समाजकार्यासाठीं
त्याच रीतिनें त्याच हेतुनें हें मन्दिरही पुढती

दिवङ्गताचें नांव शिरावर मिरवित अभिमानानें
नागरिकांचीं फुलविल हृदयें अभिनव चैतन्यानें

सभाजनांनो, स्मारकसमिती म्हणुन आजपासून
निवृत्त होतें सुसज्ज मन्दिर नगरीतें अर्पून

स्मारकमन्दिर, मी तर म्हणतों, निवापाञ्जली मूर्त.
दिवङ्गताचा कार्यमन्त्र घ्या साधुनि हाच मुहूर्त.

खण्ड न पडतां कार्य आपुलें आहे चालू पुढतीं
बघुनि मृताचा आत्मा पावे सन्तोष नि चिर शान्ति !"९२

घुमुन राहिली सभापतीची मन्दिरांत त्या वाणी
दिवङ्गताचा आत्मा देई साथहि तिज वरतोनीं

परि न साथ ती उत्साहामधि ऐकूं कोणा आली
नाहीं तर त्या विरजण पडलें असतें उत्सव-कालीं

करीत होता साथ मृताचा आत्मा तार स्वानें
" सभाजनांनो, जरी तुम्हांला माझें व्रत आचरणें

तयार तरि व्हा भोगायाला ह्याच जनांच्याकडुनी
मानखण्डना, शिव्या, वैर कटु, पिळवणूक कडकडुनि "

टाळ्यांचा कडकडाट झाला म्हणुन मृताची वाणी
विरून गेली पडण्यापूर्वी सभाजनांच्या कानीं १०२

पुण्यतिथीच्या त्याच रात्रिला दिवङ्गताची कान्ता
पहात होती भविष्य अपुलें स्वप्नामधिं दुःखार्ता—

दिलें लोटुनी घरांतुनी तिज कुणी लेंकरांसहित
नाहिं निवारा तिजसी उरला विशाल त्या नगरींत

फिरतफिरत ती येइ मन्दिराचिया वळचणीखालीं
आणि लेकरें तिचीं पायऱ्यांवरीच झोपीं गेलीं.

येइ सकाळीं भय्या जेव्हां मन्दिर झाडायास
" चलो, निकालो; न ही चावडी ! " वसके अनिकेतांस.

मुलांस घालुनि पुढें, फाटकांतुनि बाहेरी पडतां
वळुनि पाहि ती सहज मन्दिरा दीन विव्हला व्यथिता.

मन्दिरफलकावरिल अक्षरें तों झगझगतीं दिसलीं
आणि पावलें तिचीं जागच्या जागीं खिळलीं थिजलीं !

तोंच बोलला फिरून भय्या [ जयांत भरली गुर्मी,
स्वल्पाहे सत्ता पाहि न वच निज कुणा लागती वर्मी ]–

" आव कशाला वाचायाचा उगाच ? जा कीं बाई !
राखण करितो स्मारकमन्दिर, नव्हे धर्मशाळा ही !" ११८

डिसेंबर, १९४०

# ३९. तीर्थास आवाहन

[ १ ] [ भूपाळी ]

मंगल राज्याभिषेक मंगल कार्य घरीं माझिया
निघालें कार्य घरीं माझिया
म्हणुनि सयांनो, तुम्हांस आले आमन्त्रण द्यावया.
विश्वामित्री दीन केवला भगिनी जरि सानुली
आपुली भगिनी जरि सानुली
कृतार्थ तिजला करा आपुल्या सिञ्चुनि तुहिनावली.
ये मराठियांच्या माते। ये वत्सल कृष्णामाई
ये समर्थांचिया दूती। ये सखये कृष्णामाई
वारणा-कोयना-भीमा—। वेण्यादि सख्यांसह येई
तव जलांतल्या वीर्यानें। थाटली थोर शिवशाही
हें राज्यहि गायकवाडी। शिवशाहिचीच पुण्याई
ध्वज भगवा शिवशाहीचा। साक्ष तीच सांगत राही
गायकवाडी रियासतीमधिं पान उघडतें नवें
आजला पान उघडतें नवें
म्हणुनि तुवां हें सये साजिरें कार्य कराया हवें.

[ २ ]

मुळा-मुठांनो, प्रीत कीर्त या गात पेशवाइची
तडित्सम हिंदुपातशाहिची
तेंवि जाग भारता देइ त्या लोकमान्य विभुतिची

विजयनगरच्या साम्राज्याची पताकाच फडकती
उर्वरित पताकाच फडकती
'वेदांची धात्री' च म्हणोनी ख्यात तशी भारतीं—
ती तूं तुङ्गा, तशीच भद्रा —परस्परालिंगनीं
होतसा मुदें एकरूपिणी
तुम्हां बाहते करावयातें संस्कृतिची राखणी.
ये दक्षिण गंगे गोदे । घेउनी पताका दिण्ड्या
ये रामचन्द्र-सीतेच्या । घेउनी कथामृत-हण्ड्या
त्या प्राणहितादि नद्यांच्या । भरभरुनि आण कासण्ड्या
नजराण्यास्तव काशतृणाचे धवल फेनसम तुरे
घेउनी हिऱ्यासारखे तुरे
येउनि माझ्या गेहीं, मङ्गल कार्य करी साजिरें.

[ ३ ]

'इथेंच आहे, इथेंच आहे, इथेंच आहे खरा
स्वर्ग ह्या वसुन्धरेवरि खरा'
जिचा उगम पाहुनी प्रगटली जहांगिराची गिरा
अशी मूर्त सौन्दर्य-देवता जीच्या तीरावरी
नान्दते अवतरुनी भूवरी
आत्मविसर्जन करावयातें जिच्या बाहती दरी
मदालसा सुखविलासिनी जी ठायींठायीं पथीं
विसावा घेत घेत जाइ ती

मार्गी तिचिया अशीं पसरलीं सरोवरें तरि किती
बिजवाऱ्याचें देवालय तें परचक्रापासुनी
रक्षिलें चातुरीच लढवुनी
तिच्या गुदगुल्या अजुनि उसळती जीच्या लहरींतुनी
गत संस्कृतिच्या विभवाच्या । चिन्तनीं सन्थ कधिं जाई
तटवासि कलावन्तांना । स्फूर्तिदायि जी नित होई
पावलोपावलीं तैशी । जी थबकुन मुरडुन पाही
श्रीनगरांतिल निर्माल्यालङ्कृती मुदें मिरविते
'वितस्ता' स्वनाम जी सांगते
अये स्वर्धुनी ! तुजविण कां मम कार्य यथासांग तें.

[ ४ ]

ये ये सिन्धू, प्रभूतसलिला वेगवती तूं खरी
सर्वथा भारतीय तूं खरी
परोपनिसदी-पारसिकांच्या भुलसि यशा क्षण जरी.
इतिहास सांगती तूतें । काबूल आणि ती स्वात
ह्या चिनाब सतलज रावी । ह्या बियास झेलम मत्त
अर्पिलें अशा कितिकांनीं । तरि तुझिया चरणीं स्वत्व
तैशीच ब्रह्मपुत्रा ती । तव भगिनी तुल्य गुणांत
परन्तु मानससरोवराच्या दुहितांनो गा तुम्ही
होतसा विरहानें का श्रमी ?
भेटिसुखाची पर्वणीच, या, साधा मम आश्रमीं.

[ ५ ]

गङ्गामाई ! आर्यावर्ता तूं तर मातामहा
गाजसी तूं तर मातामहा
त्वज्जल-मज्जन घडो अन्तरीं सकलांच्या ही स्पृहा
मुरलिधराची मूर्ती चिन्तित वृन्दावन-विहारिणी
पातली कालिन्दी वाहिनी
रामराज्यगुण गात येतसे शरयू ही इकडुनि
नीला, ब्रह्मा कितीक गङ्गा तुझिया आलिङ्गनीं
सुखावति तुझिया आलिङ्गनीं
आणि गण्डकीसम सरिता किति देती तुज खण्डणी
व्यास वाल्मिकी भारतभूषण कविवर्यांची गिरा
प्रस्फुरे कविवर्यांची गिरा
प्रसाद तव ते —कबीर-भजनें, तुलसीचा दोहरा.
किति बलाढ्य राजवटींचें । ऐकिले तुवां पोवाडे
दूरदूरच्या योद्ध्यांचे । तव पात्रीं न्हाले घोडे
जन्ममृत्युचे कितिकांनीं । तव तटीं चुकाविले खोडे
होतात खुलीं मोक्षाचीं । तव तीरावरति कवाडें
अगाध-तीर्थापगा अशी तूं अगाणितगुणशालिनी
अशी तूं अगाणितगुणशालिनी
तरि करि मङ्गल कार्य साजिरें मम गेहीं येउनी.

[ ६ ]

आणि नर्मदे, अमरकण्टकापासुनि तूं धावसी
गिरिदरी घुमवित तूं धावसी
तुझिया तीरीं क्षेत्रें साक्षात् काशी वाराणसी

हिन्ददेविकटिवरी मेखला रुचिर् अशी तव कमा
त्वज्जलीं नीलिमण्यांची कमा
प्रस्तर काठावरिल दाविती दिव्य यशोधवलिमा
तव पात्रांतिल बाण पावले घरोघरीं प्रभुपदा
वारिती भक्तांच्या आपदा
तुझ्याच गेहीं तुला बाहते — खुळी न कां मी वदा !
ये साबरमति घेवोनी । त्या मुनिच्या आशीर्वचना
मिन्दोल, अम्बिका, तापी । धातूर, मही अन् पूर्णा
तुमचीच वडिलकी, मी तों । प्रतिनिधी आपुली जाणा
फल्गू, ऐरावती, पिनाकिनि, कावेरी, चम्बला,
तुम्हींही तीर्थरूपिणी; चला—
कार्य साजिरें करा गृहीं मम सिञ्चुनि मङ्गल जला.

[ ७ ]

सखे सरस्वति, पहा हिणविती मजला सगळ्याजणी
गुप्त तूं असती कधिंपासुनी—
'कीं हे श्रीचे उत्सव रुचति न तुजसि मनापासुनी'
परि कुठें तयांना ठावें । सम्पदा विसरली वैर
म्हणुनिया सरस्वति तीच्या । गृहिं इथें खेळते स्वैर
हें सख्य, सकल पुण्याई । गत कारकीर्दिची थोर
होतिल सगळ्या फजीत विस्मित मात्र पाहुनी तुला
लक्ष्मिच्या गळ्यांत घालुनि गळा
इथें विहरतां, अहा अलौकिक म्हणतिल हा सोहळा !
मङ्गल राज्याभिषेक, मङ्गल कार्य घरीं माझिया
निघालें कार्य घरीं माझिया
म्हणुनी सहपरिवार सयांनो, निमंत्रिते यावया.

## ४०. स्वातन्त्र्यलक्ष्मीस मुजरा

[ वृत्त–वियद्गङ्गा ]

दऱ्याखोऱ्यांतला आला कवी हा खास दर्बारा
मराठ्यांच्या महालक्ष्मी, तुला घे शाहिरी मुजरा
जगाचा मानितों स्वामी स्वतांला मी महा मानी
तुझ्या धामीं तुझ्या कामीं परन्तू दास हा मानी
असें शास्ता जनांचा मी परी माई तुझा भाट
दिपावें विश्व वाणीनें, इथें कां दावुं तो थाट
नभींच्या तारकाराशी पदाघातें झुगारीन
परि स्वातन्त्र्यलक्ष्मी गे ! तुझ्या पायीं सदा लीन

जिजाऊचा स्वतेजाचा, शिवाजीचा स्वशौर्याचा
मराठ्यांच्या दराऱ्याचा, तसा तो स्वाभिमानाचा,
क्षणार्धीं चित्तचक्षूंना दिसाया लागला काळ
स्वराज्यीं जेधवां भाला जहाला नाङ्गरी फाळ
नभाला चुम्बिता झाला अतां तो मोडला भाला
परन्तू वाव येथें हा तयाच्या शेष तेजाला
भिनूं दे माझिया रोमीं तयाचें थोडकें तेज
जनां देईन साङ्गोनी नसे प्यालों कधीं पेज

इथें सञ्चारतें वारें, थरारे स्पर्शनें अङ्ग
अहाहा ! जाहली वृत्ती समाधीमाजि त्या गुङ्ग

झणीं बोला मला आज्ञा त्वरें सोडीन लल्कारी
पुन्हा लावीन नाचाया महाराष्ट्रीं दर्‍याखोरीं
जहाला नाङ्गराटीचा विखारी पूर्विचा भाला
अतांच्या लेखणींतूनी नवा आणीन जन्माला

समाधी लागली आहे म्हणोनी तोंवरी बोल
मराठ्यांच्या यशोगानीं मनानें स्फूर्तिनें डोल
तनूचें भान जावोनी बनूनी शून्य त्या नजरा
पडूं दे माउली खालीं तुझ्या वेणींतला गजरा
यशाचा कौल मानोनी मुदें सोडीन दर्बारा
मराठ्यांच्या महालक्ष्मी, तुला घे शाहिरी मुजरा

३०-११-२१

## . ४१ . माण्डवी

[ जाति–अञ्जनी ]

साङ्ग तुझा सन्देश, माण्डवी, साङ्ग तुझा सन्देश.
कालचक्र हें गरगर फिरवी
किती दिसांनीं दर्शन घडवी
हृद्‍य उमलतें आज माण्डवी !
तव आचमनीं क्षणीं हरपले कितीक माझे क्लेश.

समर्थगुरुची कर्मभूमि ही
पिढ्यांपिढ्यांची जन्मभूमि ही
दर्शनदुर्लभ परि मज होई
पोटासाठीं पेहरतां हा गुलामगिरिचा वेष.

पात्रीं तुझिया खेळ माण्डिले
किल्ले राचिले, झरे खोदिले
वाद तयांस्तव तुम्बळ केले
उमेदिच्या परि वठे न पात्रीं कृतिचा त्या लवलेश.

कुठें तुझें जळ गिरक्या घेतें
कुठें शिळेच्या कवेंत घुसतें
खडकासङ्गें धडका देतें
शक्तियोग तो आजहि पढवी बळी व्हावया देश.

कहर गुदरला देशावरती
तैं घेउनि शिर हातावरती

देह ठेविले धारातीर्थीं
वीर कुठें — खळभारमुक्त हा ज्यांनीं केला शेष ?
आज मावळे योद्धे गेले
धुळीस वैभवशिखर मिळालें
काळोखीचा सिन्धु उफाळे
देशभक्तिच्या अनन्यतेचा पिकवि पुन्हां आवेश.

सञ्चरतांना तीरावरती
अर्घ्य कितीदां समर्थहातीं
पडले असतिल तुझिया पात्रीं
समर्थदूती तूंच होउनी फिरावियला आदेश.

खनाळांतुनी वाहे खळखळ
पूर्वीपरि हें तव जळ झुळझुळ
मुक्या मनाची दारुण तळमळ
तुझिया गानीं मला ऐकुं दे दासांचा उपदेश

आनन्दाचें या वनभुवनीं
स्वधर्ममन्दिर भव्य उभवुनी
प्राण वेंचिले ज्यांनीं ज्यांनीं
अन्तकाळच्या आशा त्यांच्या ठाउक तुजला क्लेश.

आज घोकतों इतिहासाचीं
पानें, पोकळ पोपटपञ्ची !
मिरास झालों उपहासाची
नसांनसांतुनि पुन्हा सळसळो त्या शौर्याचा त्वेष.

चीड अन्तरीं सदा भडकते
जिव्हेवरि परि वाणी अडते
लगाम काटेरी ही नडते
हा दंष्ट्रांना पाणि पाज तव, तुटेल ती निःशेष.
हताश मृत वीरांची वाणी
खणखणते या तुझिया गानीं
अखण्ड घुमुनी राहो कानीं
तरीच कांहीं हातुन अमुच्या धुवुन निघेल अपेश.

१७-११-२४

## ४२. माण्डवीच्या पुनर्भेटींत

[ जाति–त्ररमङ्गला ]

आज फिरुनी घडे भेट तव माण्डवी
तीच तूं पूर्वींची असुनि दिससी नवी
क्वचित कांहीं जरी जाहला बदल तो
विकलता तो तुझी परि न लव दावतो

ओघ होता जिथें रमत उजव्या तटीं
जरि दिसे आजला तेथ ताटातुटी
तेथ मळई परी विलसली वैभवीं
स्नेहभावा मिळे साक्ष ऐशी नवी

बगल डावी तुवां जवळ केली कुठें
उथळपण उखडुनी डोह होई कुठें
वळण कोठें जरा घेउनी धावसी
नर्तकीसारखी लचकुनी चालसी

संथ कांहीं स्थळीं मदभरें होउनी
फिरुनि होसी कुठें नवति कल्लोलिनी
वेषभूषाच ही बदलती वरिवरी
बदल दिसुनी न ये जीवनीं अन्तरीं

आणि ऋतुमान जरि सुकवि तव कांतितें
कां न सुखवी तुला फिरुनि विभवेंचि तें ?

भोगिसी ह्यापरी बाह्य आन्दोलना
असशि सरिते तरी तूंच चिर-यौवना

*　　*　　*

आणि हा मी तुझ्या पातलों दर्शना
दर्शनीं होइ निर्भेळ कां हर्ष ना ?

बाल्य माझें मला आठवे ह्या क्षणीं
गढुळ ही जाहली म्हणुनि सुख—पर्वणी

हासुनी खिदळुनी तव तटीं उधळुनी
सकल लीला तुझ्या सहज अनुकारुनी

दाविल्या शैशवीं तुजसि किति वाकुल्या
सकल त्या माण्डवी त्वां मुदें साहिल्या

बाल्य माझें परी कधिंच तें संपलें !
हांसणें, खिदळणें, नाचणें, लोपलें !

आणि तारुण्यही ओसरे हळुहळूं
पाउलें चालतां लागलीं डळमळूं

*　　*　　*

‘ करुनि कर्तृत्व कीं दावुं ’ ती भावना
जिरुनि मनिंच्या मनीं ठरतसे वल्गना
दर्दुरांच्या जशा पल्वलीं गर्जना
तेंवि मम मानिल्या त्या तुवां, होय ना ?

असति चैतन्य तूं मूर्त दुर्दम्य कीं
पातलों मात्र मी मूर्त नालायकी
‘ श्रेष्ठ धारिष्ट रे ठेवि बापा मनीं ’
वेदवाणी तुझ्या जी घुमे गायनीं

दर-दिनीं जरि तिच्या प्राशिल्या ओंजळी
हाय ! अनुकारितां ती न आली मुळीं.
क्रान्तिची पूर्विच्या फडकसी तूं ध्वजा
क्रान्तिसाठीं नव्या ही स्फुरे तव भुजा

त्या भुजेसी भुजा शैशवीं घासुनी
व्यर्थ बलसम्पदा दवडिली यौवनीं !
बाळपणिंचा तुझा खेळगडि, भरंवसा
होउनी फोल, निःसत्व ठरलों भुसा !

आणि पस्तावुनी ना अतां फायदा
सांगु भरपाइला कोणता वायदा ?

बाल्य जें सम्पलें तें न येणें पुन्हा
आणिं तारुण्यही लाभणें ना पुन्हा.

शुष्क शैवालसी जाहली कातडी
कात टाकावया शक्त ना ही कुडी
सम्पला जो ऋतू जीवितीं मानवी
यायचा परतुनी काय तो माण्डवी !

*　　*　　*

न्यून रतिमात्रही नच तुझ्या क्रीडनीं
रंगसी यौवनीं बाल्य सङ्गोपुनी
तूंच सुभगा जगीं धन्य चिरयौवना !
भाग्य इतुकें कुठें मर्त्य आम्हां जनां ?

जरि अम्हांसारख्या व्यर्थ गेल्या पिढ्या
पडति आशावती ! थण्ड ना तव उड्या
मसणवाटेस जे लागले बापुडे
खन्त करणें तयांसाठिं तुज नावडे

उमलते, हासते आज जी नव पिढी
धरुनि हातीं जिला पातलों तव थडीं
होय आराध्य तुज तीच जणुं तेव्हढी
म्हणुनि उत्फुल्ल कीं होसि तूं एव्हढी !

नटसि सुस्वागता तीचिया उत्सुका
आणि मम वाकुल्या फेडिसी, मानुं का ?

*　　　*　　　*

परतलों कां परी सांगुं कां तव तटीं
राख माझी पडो तव जळीं शेवटीं

आणि मातें मिळो गर्भवासीं उशी
क्रान्तिकारी नव्या ह्या पिढीची कुशी

आणि तव कामनापूर्तिच्या उत्सवीं
राङ्गण्याचें मिळो भाग्य मज माण्डवीं

३-१०-४३

## ४३. आशीर्वाद

[ जाति–पुष्पिता ]

तुज द्याया आशीर्वादा मी उचलूं केंवि हात ?
पुष्पिता लता उद्यानीं
घालितां तिला मी पाणी
तेथल्या तेथ ती होई अविलम्बें भस्मसात

करिं काञ्चनरज हो वाळू
मग केंवि तुला कुरवाळूं ?
जाईल काळवण्डूनी तव कान्ती जन्मजात.

जरि वाटे तुज कवळावें
मस्तका तुझ्या हुङ्गावें
परि उधाण वात्सल्याचें मी हटवी आंत आंत.

नभिं नक्षत्रांची शोभा
धरि मी न पहाया लोभा
निखळतील मम नजरेनें, भय नान्दे मानसांत

म्हणुनिया –जरी मी वाञ्छी–
आरती न धरि नयनांची
मग अन्तर्मुख ती जाळी जरि जीवा स्नेह-वात !

उल्हास उकळतो जेथें
सुखपूर्ति खिदळते जेथें
प्रगटून कशाला तेथें मी पसरूं काळरात ?

तूं सजसी व्योमविहारा
जा विहङ्गमा परभारा
अणु-अणूंत दूषित माझ्या वास्तव्यें येथ वात.

माङ्गल्य मूर्त होवोनी
दिग्विजयें ये परतोनी
अस्पृश्य तोंवरी येथें मी बसतों बघत वाट.

थबथबून ये अमृतानें
आणि त्या तुझ्या स्पर्शानें
दे तीर्थरूपता मातें साम्प्रत जी शब्दमात्र.

७-४-२९

## ४४. मातेस

[जाति—नववधू]

तुजविषयिं अन्तरीं प्रेम जरी
वाटते निरन्तर भीति परि !

मिरविलेस मज कडे घेउनी
चालविलेसाहि बोट धरूनी
आणि झपाझप प्रगती बघुनी

भरतेंहि तुझ्या दाटलें उरीं
वाटते निरन्तर भीति परि !

चिन्ध्यांची बनविलीं बाहुलीं
काड्यांचीं घरकुलें उभविलीं
तळीं किती खळग्यांत निर्मिलीं

केलीस कौतुकें परोपरी
वाटते निरन्तर भीति परि !

बघुनि तुझें वात्सल्यसरोवर
प्रसन्न त्यावर लहरी सुन्दर
होउनि पोटीं प्रहर्षानिर्भर

व्यापार नवे घेतले करीं
वाटते निरन्तर भीति परि !

क्रीडा सरल्या अतां पोरकट
देह लागला व्हाया राकट
पराक्रमास्तव कारितां खटपट

कां अठी कपाळावरी तरी ?
वाटते निरन्तर भीति परि !

तुझ्या रुचींची सीमा सरतां
धारण कीं करशील क्रुद्धता
वात्सल्याचा कुवा तव रिता

होईल अचानक काय तरी ?
वाटते निरन्तर भीति परि !

तुझ्या रुचींची लावुनि झापड
नाविन्याची दडपुन आवड
तीच तीच कां वाहूं कावड ?

का ध्येय तुझें हें खरोखरी !
वाटते निरन्तर भीति परि !

कुरवाळुनि मज पुन्हां जवळ घे
भाळावर जो घाम थबथबे
तो आशेनें तुजकडे बघे

श्वासेंहि नवें चैतन्य भरी !
तुजविषयीं अन्तरीं प्रेम जरी.

८-१०-१९३३

## ४५. बोगद्यांत

[ जाति–शुभवदना ]

कुठवर ही थाम्बणार बोगद्यांत गाडी !
कां न तातडी करून जाइ ही अघाडी ?

पूर्वींचें नि पुढचें तें
विश्व रम्य मज दिसतें
आज लाभलींत इथें
मात्र हीं खुराडीं !

स्नेहाचे विमल किरण
तेथ देति आलिङ्गन
तिमिर येथ थयथयून
मारितो कुऱ्हाडी.

लुटुनि तेथ सुमनगन्ध
लावि उटी पवन मन्द
स्थळ हें परि धूरबन्द
जेंवि तीं धुराडीं.

मायेची करि छाया
देइ फळें सेवाया
कटि-खान्दीं क्रीडाया
येथ न ती झाडी

खाउनि अन्धार धूर
खडक मात्र भंवतिं क्रूर
बघतां दडपेच ऊर
गोठते धडाडी.
करि न चालका, उशीर;
कळ फिरवी, ने बाहिर.
जावयास मी अधीर
आपुल्या बिऱ्हाडीं
कुठवर ही थांबणार बोगद्यांत गाडी!

१७-२-२१

## ४६. आन्धळा झालों तर—

[ सुनीत—शा. विक्रीडित ]

[ १ ]

दुर्दैवें जर आजपासुन पुरा मी जाहलों आन्धळा,
बाळांचीं वदनें प्रफुल्ल सुमनें ज्यांचा जिवाला ळळा,
ज्यांना पाहुनि कौतुकें विसरलों संसारिंच्या जाचण्या,
देवांच्या चिमण्या सुमूर्ति मिळणें कैशा पुन्हा पाहण्या ?

सौन्दर्यें भंवतीं कितीक दिसती हीं चालतीं बोलतीं,
ज्यांच्या सात्विक चिन्तनीं मज रती, गुङ्गून जाते मती
तीं सञ्चारुनि आसपास मग हीं ओसाड सृष्टी मला
आकाशीं तळपून भास्कर मला अन्धार सामावला !

हे उत्तुङ्ग गिरी, अफाट नभ हें, हे रम्य अस्तोदय,
हे गम्भीर अथाङ्ग सिन्धु, गगनीं तारेहि तेजोमय,
मेघांच्या विविधाकृती बदलत्या, ते रङ्गही नाचरे
पाहाया नच लाभतां रिझवुं मी कैसा मनाला बरें ?

'देवा, मृत्यु नको' असें विनाविलें सौन्दर्यलोभामुळें;
देवा, आयु नको' असें विनवितों होणें जरी आन्धळें.

५-६-२२

# ४७. आन्धळा झालों तर

[ सुनीत–शा. वि. ]

[ २ ]

देवाच्याच मनांत येउनि जरी मी जाहलों आन्धळा,
चित्तीं भीति न वाटते लव तरी, गाईल माझा गळा.
गाणीं गाउन नित्य डोळस जनां सन्मार्ग मी दाविन,
जे पान्थस्थ निराश होतिल, तयां सञ्जीवनी पाजिन

ज्याचें दर्शन नेइ ओढुनि मना पापी विचाराकडे
आपोआप टळेल तें, मज गमे सद्भाग्य हें केवढें !
जें बीभत्स तसेंच निन्द्य जगतीं जें दृश्य घाणेरडें,
दुष्टांचेंहि मुखावलोकन तसें होईल ना यापुढें.

ज्यानें आपुलिया मना पढविलें धोण्डा हिरा सारखा
त्याला काय विषाद तो स्वनयनां झाला जरी पारखा ?
काळाच्या पडद्यापल्याड भरलें तें पाहतां येइना—
ते हे दुर्बल चर्मचक्षु नसतां हानी न वाटे मना.

चित्रें रङ्गवितो, मना रिझवितों, अज्ञात मी पाहतों,
ते जे लोचन आंत खोल दडले त्यांनाच मी मानितों.

५ ६-२२

# ४८. पाणपोई

[ वृत्त—व्योमगङ्गा ]

येइं भाई येथ पाही घातली ही पाणपोई
धर्म-जाती कोणती ती भेद ऐसा येथ नाहीं
संसृतीचा हा उन्हाळा, तल्खली होई जिवाची
स्वेदबिन्दू अश्रुधारा यांविना पाणीच नाहीं

वायुवीची भोंवतीं आन्दोलुनी त्या वञ्चिताती
झोम्बती अङ्गीं झळा अन् मूर्च्छना ये ठायिं ठायीं
साउली नाहीं कुठेंही तापतो मार्तण्ड डोईं
श्रान्त पान्था ! बान्धली ही तुझियासाठीं सराई.

आद्य जे कोणी कवी तत्स्फूर्तिच्या ज्या सिन्धु गङ्गा
आणिल्या वाहून खान्दीं कावडी त्यांतील कांहीं
पान्थसेवासाधनीं हें व्हावयातें गार पाणी
मृत्तिकेचे मात्र माझे कुम्भ, ही माझी नवाई

ओञ्जळी, दों ओञ्जळी आकण्ठ किंवा घे पिऊनी
हो जरा ताजातवाना, येउं दे सामर्थ्य पायीं
पावतां तृप्ती मना, सञ्चारतां अङ्गीं उमेदी
जो दुवा देशील पान्था तेवढी माझी कमाई

१२-५-२७

## ४९. सरितेचें चरित

करिते का कधिं खन्त
सरिता करिते का कधिं खन्त ?

राङ्गत लोळत दौडत घोळत
कडेकपारींतुनी खळाळत
आक्रमिते निज पन्थ ॥ सरिता० ॥

फुलो चान्दणें, असो ग्रीष्मदिन
असो तमिस्रा ढगाळ भीषण
समान शिशिर वसन्त ! ॥ सरिता० ॥

कुणी आणिली घागर मृण्मय
पखाल किंवा कलश हिरण्मय
पहावया न उसन्त ॥ सरिता० ॥

करोत मज्जन रूप-यौवना,
दुर्जन, सज्जन, जरठ, अङ्गना
असो रङ्क धनवन्त ! ॥ सरिता० ॥

करोत कोणी अस्थि-विसर्जन
ताबुत किंवा देव गजानन;
स्वागतशील उदन्त ! ॥ सरिता० ॥

मरुभूमींतुन दहनभूमिंतुन
गात चालली एकच गायन—
'करुं जग शोभावन्त !' ॥ सरिता० ॥

भेद्भाव परि निर्मुनि; मानव—
होई दानव; तरङ्गिणी लव—
गणी न हंस तरन्त ॥ सरिता० ॥

असें सन्तसम जीवित आखुन
आसमन्त ही करीत पावन
चरिते सिन्धु अनन्त
सरिता विश्रुत-चरित दिगन्त.
करिते का कधिं खन्त
सरिता करिते का कधिं खन्त ?

१-३-३६

## ५०. बाणा

[ जाति–मोहिनी ]

काय होइ विन्मुख कैचा तरी देवराणा ?
उभे राहुं आम्ही अमुच्या जरी परित्राणा.

कैक सङ्कटांच्या राशी शिरीं कोसळोत
पडो तेंवि लोखण्डाचा तप्त रसस्रोत.
तनूभोंवतालीं जळते नाचुं देत पोत
कदर करायाची नाहीं हाच मुळीं बाणा.

चित्तचक्षु सन्तत जागे दक्ष कीं खलाशी
आंत शक्ति होकायन्त्रापरी ध्येयदर्शी
उभीं धीर-वचनें मार्गी दीपगृहाऐशीं
काय पोंचणार न नौका योजिल्या ठिकाणा ?

योजिली अम्हांस्तव त्यानें जरी माळ-जागा
कसूं कम्बरा फुलवाया तेथ रम्य बागा
विफल यत्न झाले तरिही कधिं न करूं त्रागा
भुलुनि तोच येइल अमुच्या पुष्पपरागांना

लोटिलें तयानें किंवा सिन्धुच्या तळाशीं
रविप्रकाशास्तव तेथें जीव जे उपाशी
खुल्या जगीं आणूं प्रेमें धरुनि त्यां उराशीं
आणि विनवुं ‘ पावन करुनी प्रभो ! घ्याच यांना ! ’

दाविली तयानें किंवा जरी बन्दिशाळा
तिथें लावुनी तुळशीचें रोप पुजूं त्याला
खलांच्याहि हृदयीं स्फुरवूं भक्तिचा उमाळा
भासवूं तया हें गोकुळ; नव्हे बन्दिखाना.

६-२-२९

## ५१. अढळ सिंहासन

[ सुनीत–शा. विक्रीडित ]

युद्धांचे भडकून घोर वणवे राज्यें जळालीं किती
लोकक्षोभ कुठें कुठें प्रगटुनी तख्तें किती भङ्गलीं
अम्बारींतुनि हिण्डतां तुडविलीं ज्यांनीं प्रजा लेकरें
अम्बारी उलटी करीं धरुन ते रस्त्यांतुनी हिण्डती
होवोनी जनताजनार्दन बळी सिंहासनें भूषणें
बाजारामधिं माण्डुनी फुकतसे सारीं लिलावांतुनी.
झाली नम्र सदा समस्त जनता ज्या राजचिन्हांपुढें
त्यांना हातळुनी खुशाल बघती येणार जाणार ते.

ऐसे धिण्डवडे बघून जगतीं, ऐश्वर्यसत्तेप्रती—
ज्यानें त्यागुनि सेविली मुरविली वैराग्यवृत्ती मनीं
स्वोद्धारास्तव ठाण माण्डुनि तसें लोकोपकारास्तव
काया-चन्दन-घर्षणीं निरवतो आयुष्य जो आपुलें
चारित्र्यें तपतो, तमास हरतो कोणी महात्मा जन
लोकांच्या हृदयामधील ढळतें त्याचें न सिंहासन

२८-११-२४

## ५२. तुरुङ्गाच्या दारांत

[ वृत्त—भ्रान्त ]

वाढुं दे कारागृहाच्या भिन्तिची उञ्ची किती
मन्मना नाहीं क्षिती

भिन्तिच्या उञ्चींत आत्मा राहतो का कोण्डुनी ?
मुक्त तो रात्रन्दिनीं !

भाक्तिला जो पूर आला वाढतो तो अन्तरीं
पायरीनें पायरी;

फत्तरांच्या या तटांनीं ओसरावा काय तो ?
सारखा फोफावतो.

अञ्जनीच्या बाळकानें सूर्यबिम्बा ग्रासिलें
मन्मनीं तें बिम्बलें

घालिती सैतानसे शत्रू इथें थैमान जें
तें गिळाया मी सजें

अग्निकुण्डीं पाय केव्हां, कण्टकींही केधवां
बन्दिखान्याची हवा

या विलासांमाजि होई आमुची जोपासना
तेज नाहीं यांविना.

हिन्ददेवी, गोन्धळी मी वाजवीतां सम्बळ
घालसी हातीं बळ

पेटलेला पोत हातीं स्वार्थतैलें तेवतां
नाचवूनी नाचतां

या दऱ्याखोऱ्यांतुनी स्वातन्त्र्यगीतें गाउनी
दावितां मी हिण्डुनी

आज आलों निर्भयें या मन्दिरीं विश्रान्तिला
मान्य झालें हें तुला.

त्वत्कृपेचा सिन्धु माझ्या मस्तकीं हेलावतां
काय दुक्खांची कथा ?

अग्निही वाटेल मातें चन्दनाचें लेपन
कीं सुधेचें सिञ्चन.

शृङ्खला पायांत माझ्या चालतांना रुमझुमे
घोष मन्त्रांचा गमे

लौकरी स्वातन्त्र्यभानो ! भारतीं दे दर्शन
होउं तेव्हां पावन

३०-७-२२

## ५३. शृङ्खलेस

[ जाति–मुद्रिका ]

### शाप आणि उःशाप

**निर्माता—**

ही खळखळ करिसी काय म्हणुनि शृङ्खले ?
हें गीत काय हर्षाचें ? कीं हृदय विषादें उले ?
हा इसम खुनी त्वां करीं पदीं जखडिला
ह्याविना जीविता व्हावा तुज हेतु कोणता भला ?
घामांतुनि निपजे दाम तया जो हरी
अङ्गार ठेवि जो किंवा अबलांच्या शीलावरी
पाशांत तुझ्या करकचुनि तया फिरवितां
मिरवणूक सामर्थ्याची कां तुझ्या न ती तत्त्वता ?
पखवाज नि चिपळ्या टाळ भागल्यावरी
ती प्रभावशाली होई तव सुरांतली माधुरी
मग खेद कशाला धर्म-नीति-पालिके ?
करुं नकोस खळखळ; मानी सार्थक हें जन्मीं निकें !

**शृङ्खला—**

समजूत महाराज ही घालितां जरी
हें महद्भाग्य मी माझें मानणें कोंवि अन्तरीं ?

ह्या धर्मनीति-रक्षणीं सर्वदा घडे
मज सङ्ग असङ्गांचा; हें दुर्भाग्य तरी केवढें
आजन्म लागतें मला रिझविणें खलां
कीं शापच सर्वस्वीं हा, मानिंते मनीं शृङ्खला

**निर्माता—**

शृङ्खले, ऐक, मूतळीं तुझे जे धनी
होतील धुन्द पाहोनी सामर्थ्य तुझें शासनीं
अधिकारमदें बेबन्द आणि वागुनी
योजितील तुज सुजनीं ही विधिनिषेध गुण्डाळुनी
रञ्जल्या-गाञ्जल्या गणुनि आप्त, जे कुणी
डिवचतील सत्तान्धांना ते येतिल तव बन्धनीं
त्या पुण्यश्लोकांचिया पदीं लागुनी
उद्धार करुनि घे; देऊं उःशाप काय ह्याहुनी ?

५-११-३८

## ५४. मायभूमीस अखेरचें वंदन

[ जाति–धवलचंद्रिका ]

वन्दन तुज मायभूमि ! हें अखेरचें
न कळे तव दर्शन कधिं फिरुन व्हायचें !

विस्कटली बसवावी फिरुन ती घडी
तव कार्जी झिजवावी शक्य तों कुडी
आशेची फोल परि भ्रमुनि बावडी
देशोधडि लागे ही आज बापुडी
आंचवलों जननीच्या सौख्यकारणा
आंचवलों तेंवि तुझ्या क्लेशवारणा
काय म्हणूं परिसमाप्ति ही तुला रुचे ?
वन्दन तुज मायभूमि हें अखेरचें

यश मळलें उजळाया फिरुन त्याप्रती
तळमळलों धडपडलों निशिदिनीं किती
परि भूवरि पाय कुणी टेकुं ना दिला
काकांचे जेविं थवे भ्रष्टल्या पिला
काडीचा आधारहि मानिला महा
झाली परि फसवणूक नित्य दुस्सहा

मान उञ्च करुं पाहे कोंवळी कळी
धडगत लागेल तिची केविं वादळीं ?
झिडकारुनि दिधलें जें लेकरूं तुवां
टाकलास ज्याचा तूं तोडुनी दुवा
तरि त्याच्या नच खळती अश्रु नेत्रिंचे
वन्दन तुज मायभूमि हें अखेरचें

मरणाच्या दाढेमधिं चाललों जरी
मरणाच्या भीतिचा न लेशही उरीं
मरणाच्या खाईमधिं आयु कण्ठलें
मरणाचें काय तया बुजग-बाहुलें ?
ग्रीष्माचा दाह काय वाळल्या तृणा ?
राखेला जाळिल कां अग्नि तो पुन्हां ?
परि तुझी न भेट मला व्हायची पुढें
ह्या शल्यें हें तुटतें मात्र आंतडें
मिळणार न अन्त्य शयन गे त्वदङ्किचें
वन्दन तुज मायभूमि हें अखेरचें

## ५५. हा अफाट सागर पुढें

[ जाति—वरदायिनी ]

भरशील कोठवर गड्या आपुल्या विहिरीवरती घडे ?
पहा तो अफाट सागर पुढें

तव परसामधली विहीर ती धाकटी
फुलविलीस तिजवर बाग जरी गोमटी
तिजमधली सारीं हंगामी रोपटीं
तव परिश्रमांची कशी पटावी साक्ष भविष्यापुढें
इथें हे भराशिल कुठवर घडे ?

ती वर्षाकाळीं तुडुम्ब होती खरी
मनसोक्त तदा डुम्बलास दर दिन जरी
कडकडल्या ग्रीष्मीं सूर मारिसी तरी ?
का कपाळमोक्षाविना श्रेय हें मिळेल गिरवुन धडे ?
पहा तो अगाध सागर पुढें

त्या विहिरींतला मुळीं जिव्हाळा थिटा
त्यांतुनी तिच्यावर गांवाचा पायटा
नरटीनें थेम्बहि खरवडती शेवटा
कां वृथा पोहरा तरी सोडिसी, भरसी नुसते खडे ?
असोनी रत्नाकर तो पुढें

डोणींतहि नावा नाचवुनी कागदी
रिझविलींस बाळें तसल्या खेळामधीं
त्या खेळांतच परि दंग अजुनि तूं सुधी !
बाळेंहि टाकुनी बाल्य लागली पाहूं क्षितिजाकडे
इथें तूं भरसी कुठवर घडे ?

नावेस कागदी चिमुटहि ओझें महा
श्वासेंहि तिला जलसमाध मिळतें पहा
आपेंचि विरे वा न मोजिले जों दहा
कां छन्द तिचा, बुडणेंहि जिचें निर्मी न कधीं बुडबुडे ?
गड्या, बघ अफाट सागर पुढें !

हा समोर सागर ताण्डव-नर्तन करी
सामर्थ्य सळाळत असेल ज्यांच्या उरीं
घेईन तयांना म्हणतो झेलुन शिरीं.
चल, रत्ननिधीच्या नजराण्यास्तव चढव जहाजा शिडें
इथें हे भरशिल कुठवर घडे ?

तें क्षितिज रङ्गलें सोनेरी ताम्बडें
घालील अङ्गणीं कुणी तसे का सडे ?
का भरविल हातीं मणि-काञ्चनमय चुडे ?
ही वदुनि मनीषा दावि मायभू पिळवटुनी आंतडें
गड्या, बघ रत्नाकर हा पुढें !

हो सज्ज तिर्ची तर आस कराया पुरी
मग परिश्रमांना अपेश आलें जरी
मिरवीत कलेवर तुझें किनाऱ्यावरी
आणील सिन्धु हा, वाजवीत निज लाटांचे चौघडे !
इथें का श्रमसी भरुनी घडे ?

२८-१-३८

## ५६. अन्य नको वरदान

अन्य नको वरदान
प्रभो, मज अन्य नको वरदान

कोणी अंवतीं-भंवतीं माझ्या
जमले किंवा जमवियलें ज्यां
पुरवायातें त्यांच्या गरजा
द्या सामर्थ्य निदान
प्रभो, मज अन्य नको वरदान.

कोठें चिमणें बालक रडतें
कोठें शोकीं कुटुम्ब बुडतें
त्वरित तयांना रिझवायातें
द्या मजला अवधान
प्रभो, मज अन्य नको वरदान.

जरी विसम्बुन या बाहूवर
कुणी बिलगला दुर्बल जर्जर
तो नच व्हावा वञ्चित रतिभर
इतुकें द्या अवसान
प्रभो, मज अन्य नको वरदान.

नरकीं पिचती बन्धू-भगिनी
सजती त्यांच्या जे उद्धरणीं

द्याच तयांस्तव स्फूर्ति मन्मनीं
गाया प्रेरक गान
प्रभो, मज अन्य नको वरदान.

तसाच येतां प्रसङ्ग बाका
'अहो, उठा जन लज्जा राखा'
अशा दशादिशीं फुटतां हाका
द्या हातांत कृपाण
प्रभो, मज अन्य नको वरदान.

घावामागुनि घाव बैसुनी
देह शोणितें निघतां न्हाउनि
विह्वळतां जन भंवतीं मरणीं
न चळो धैर्य इमान
प्रभो, मज अन्य नको वरदान.

२-५-१९३३

## ५७. द्या आम्हांला सुळीं

[ जाति–समुद्‍तिमदना ]

द्या आम्हांला सुळीं, जाहलों आम्ही तुमचे बळी
जगीं चिरन्तन नान्दतील परि अमुच्या शाणव कुळी

खुडून टाका अम्हांस – आम्ही दुर्वाङ्कुर भूतळीं
पाताळापर्यन्त आमुची परन्तु रुजली मुळी.

काय हटवुनी हटतो सागर ? – हटेल एकीकडे
उफाळेल तो दुसरीकडुनी गिळून डोङ्गर कडे

ज्वालामुखिला बघतां लिम्पूं ? काय कल्पना खुळी !
तोच अनावर उद्यांस होइल जागृत शाणव कुळीं.

भाऊराया ! देवकिचीं हीं वधा सात अर्भकें
किती तोकडे उपाय ? त्यांनीं होणारें कां चुके ?

बान्धुनियां अन्धार-कोठड्या, वधस्तम्भ रोवुनी
बलोद्धतांनो ! धराल का अवतार-कार्य रोधुनी ?

शिळेवरी आपटा आमुचीं अहो शिरें कोवळीं
सुटून तुमच्या मुठींतुनी परि शक्ति जगीं मोकळी

द्या आम्हांला सुळीं ! जाहलों आम्ही तुमचे बळी.
अमर तत्त्व ; – अवतार तयाचा वाढतसे गोकुळीं

द्या आम्हांला सुळीं आणि व्हा कलेवरांचे धना
फोडुनि पणत्या ज्योतितत्त्व कां जाई जगतांतुनी ?

द्या आम्हांला सुळीं आणखी मूठ-मूठ घ्या धुळी
रुण्डमालिका अमुची त्या तर ज्योतिवरिल काजळी.

मरणीं अमुच्या अनेक फुलतिल लोकीं दीपावली
जेत्यांनो व्हा पराभूत हो देउनि आम्हां सुळीं

खुशाल द्या फासांत गुन्तवा एकेकाचा गळा
पुरा साजरा करा आमुच्या विजयाचा सोहळा

आजवरी जुळविली यथामति जी जीवित-पुस्तिका
फाशीविण तिज नसे समुचिता भरतवाक्य-गीतिका

द्या आम्हांला सुळीं ; होउं द्या कृतार्थ जन्मुनि कुळीं
पितर मुक्तिच्या मोदें म्हणतिल, “ धन्य पुत्र हे बळी. ”

भावि पिढ्यांना मिरवायास्तव अपुल्या वक्षःस्थळीं
तजेल अक्षय चिन्ह द्यावया द्या आम्हांला सुळीं.

१४।१५-५-४५

## ५८. सत्य न मरतें दळभारें !

[ जाति—श्यामाराणी ]

तव यशा आणिती लाञ्छन रे
लाडकीं सकल हीं तव पोरें

पूर्ण आन्धळा तूं धृतराष्ट्रा
बान्धी गान्धारी निज नेत्रां
पुरें फावलें सहजीं पुत्रां
उधळाया निज गुण सारे.

भीमाचें बळ उसळ्या घेतें
धर्म घालितो लगाम त्यातें
म्हणुनि काय या शान्तिघनातें
दावावीं कारागारें ?

गुलाम झाली द्रुपदसुता ही
म्हणुनि हिला का लाजचि नाहीं
हिच्या हिसकती निरीस पाही
इभ्रतिचें पिउनी वारें.

हाक सतीची कोटि मुखांनीं
फुटते, परि ती यावि न कानीं

यास्तव भंवतीं तुझ्या सुतांनीं
बन्द गमे केलीं दारें !

दिसे न, ऐकुं न ये, परि न कळे –
कीं सिंहासन तुझें डळमळे ?
आवर बाळें; थाम्बवि चाळे,
सत्य न मरतें दळभारें !

३-७-१९३०

## ५९. फडकतें तुझें तेथेंच निशाण !

[ जाति—नववधू ]

फडकतें तुझें तेथेंच निशाण !
कृषिक जाहला मजूर सारा
सोनें पिकवुनि भरतो सारा
अन्ना परि मोताद बिचारा
कर्जांत वाढत्या हो हैराण
फडकतें तुझें तेथेंच निशाण !

राबुन दिनभर पोटासाठीं
दाम पुरेसे जमति न गांठीं
जाई झोपीं अर्ध्या पोटीं
परि धन्यास जेथें नाहिं गुमान
फडकतें तुझें तेथेंच निशाण !

ओझ्याखालीं मरते माता
लाभ न तिजला घामापरता
पयोद तीचे शुष्कच भाता
करि जिथें बाळ त्यांवरि गुजराण
फडकतें तुझें तेथेंच निशाण !

बाल्य खुरटलें जेथें सारें
तारुण्यांतुन गेलें वारें

त्राण कुणांत न, दैन्य वावरे
नैराश्य पावतें जेथ उधाण
फडकतें तुझें तेथेंच निशाण !

स्थितींत दु:सह ह्याच भयङ्कर
कुजत पडावी प्रजा निरन्तर
हूं-कीं-चूं करतांच तिच्यावर
झणिं जिथें उपसलें जाइ कृपाण
फडकतें तुझें तेथेंच निशाण !

अधाशीपणा शिकवि हिंस्रता
रुधिराश्रूंनीं भरती सरिता
व्यापी आक्रन्दन दिक्प्रान्ता
त्यामाजिं जिथें शास्ता रममाण
फडकतें तुझें तेथेंच निशाण !

१२-२-३५

## ६०. गाउं त्यांना आरती

[ वृत्त- भ्रान्त ]

सङ्गरीं वीराग्रणी जे धैर्यमेरू सङ्कटीं
जन्मले या भारतीं
राष्ट्रचक्रोद्धारणीं कर्णापरी ज्यांना मृती
गाउं त्यांना आरती

कोन्दला अन्धार मार्गीं खाचखड्डे मातले
तस्करांनीं वेढिलें
सम्भ्रमीं त्या जाहले कृष्णापरी जे सारथी
गाउं त्यांना आरती

स्वार्थहेतूला दिला सङ्क्षेप ज्यांनीं जीवितीं
तो परार्थीं पाहती
आप्तविस्तारांत ज्यांच्या देशही सामावती
गाउं त्यांना आरती

देश ज्यांचा देव त्याचें दास्य ज्यांचा धर्म हो
दास्यमुक्ति ध्येय हो
आणि मार्कण्डेयसे जे जिङ्कितीं काळाप्रती
गाउं त्यांना आरती

देह जावो देह राहो नाहिं ज्यांना तत्क्षिती
लोकसेवा दे रती

आणि सौभद्रापरी देतात जे आत्माहुती
गाउं त्यांना आरती

जाहल्या दिङ्मूढ लोकां अर्पिती जे लोचनें
क्षाळुनी त्यांचीं मनें
कोटिदीपज्योतिशा ज्यांच्या कृती ज्यांच्या स्मृती
गाउं त्यांना आरती

नेटकें कांही घडेना, काय हेतू जीवना
या विचारीं मन्मना
बोधितों कीं " एवढी होवो तरी रे सत्कृती
गा तयांची आरती "

८-६-२६

 **विश्रान्ति** 

## टीपा

**आई**—पोरक्या मुलाचा मातृशोक.

**प्रतीक्षा**—परगांवीं गेलेल्या पतीच्या वाटेकडे डोळे लागून राहिल्यामुळें, नित्याचे व्यवहार कसे चालले आहेत त्याचें वर्णन पहिल्या चौदा ओळींत आहे. पुढें पति आल्याची सूचना असून, ' तिजसि झोंपुं द्या ' आणि ' तुम्हिच घ्या नि द्या तिला ' हे त्याचेच उद्गार आहेत.

**झाल्या तिन्हि सांजा**—शेतकी पेशांतील घरधनीण शेतावर गेलेल्या घरधन्याची वाट बघत आहे. परधान्या व राजा ही बैलजोडी, शालू व हिरा ह्या दोन कालवडी, मधू व मन्जी हीं दोन चिमणीं बाळें, पिसाळ हा शिवारांतील शेजारी. शिवारांतल्या शेजाऱ्यांत सख्य भाव क्वचितच असतो; कटाकटी, हाणामाऱ्याच फार.

**गृहिणी मी, नच देवी !**—स्त्री जातीला Fair sex ह्या बिरुदानें गौरवून, तिची पुरुषवर्गाकडून जपणूक केली जाते. समाजाच्या तळांतल्या श्रमजीवी वर्गाचा अपवाद वगळल्यास, जों जों वरच्या वरच्या वर्गाकडे पाहावें तों तों साधन-संपत्तीच्या अनुकूलतेच्या प्रमाणांत ती जपणूक अधिकाधिक दृष्टीस पडते. " आश्रयेन शोभन्ते कविता वनिता लता ' ह्या सुभाषितांत जपणुकीचीच छुपी प्रशंसा नाहीं का ? ह्या जपणुकीच्या वागणुकीचा उबग आलेल्या जागृत महिलेची भाषा कांहींशी अशीच राहील.

**नसे जग सर्वस्वीं अनुदारः**—पहिल्या दोन कडव्यांत कोणती विशेष कथा अध्याहृत नसून, हरिदासी दंतकथांचा अनुवाद केला आहे. तिसऱ्या कडव्यांतील कथेसाठीं दीर्घिका, मांडव्य, यांचीं चरित्रें पाहावींत ( प्राचीन चरित्र–कोश पृ. २४१ व ४४२ ). चौथ्या कडव्यांत प्रयागजी अनंत फणसे याच्यावरील गंडांतराचा उल्लेख आहे (मध्ययुगीन चरित्रकोश पृ.५३०). कडवें पांचवें—संभाजीच्या प्रीत्यर्थ आजन्म कुंवारपण पत्करणारी झेबुन्निसा ( औरंगजेबाची मुलगी ) तीच ही दुष्मनदुहिता. ( पाहा सनपुरीची बखर ).

## युगंधरांचें पालुपद

दुसऱ्या जागतिक महायुद्धाचा शेवट जसजसा जवळ येऊं लागला तसतसा ' युद्धोत्तर पुनर्घटना ! युद्धोत्तर पुनर्घटना !' ह्या विषयाचा उहापोह वर्तमानपत्रांतून ठळकपणानें होऊं लागला. विश्वचिंता वाहणाऱ्या महाभागांच्या तोंडीं ही जी शब्दसंहति घोळूं लागली ती जरी चालू युगाची असली तरी तिच्यामागील कल्पना नवीन नाहीं. नमुनेदार समाजरचना व राज्यव्यवस्था अस्तित्वांत येऊन, अखिल मानवजातीला शाश्वत सुखशान्तीचा लाभ घडावा हा हेतु प्रत्येक युगधुरंधराच्या अन्तःकरणांत घोळत आला आहे. ह्याच महान् कार्यासाठीं परमेश्वरानें ' संभवामि युगे युगे ' असें आश्वासन दिलें आहे. अशा रीतीनें इतके अवतार झाले असूनहि, अजून समाजरचनेची आदर्श सिद्धता होत नाहीं.

आम्ही मानव. बुद्धि हें आमचें वैभव. इतर प्राण्यांपेक्षां आमचा ह्या बाबतींत वरचढपणा. आम्हीं आमचे अवघड प्रश्न बुद्धीच्या जोरावर सोडवूं शकतों. तथापि, ह्याहि दृष्टीनें पाहूं जातां, आमच्या मार्गांतील धोंड बुद्धिबळानें बाजूला सरकेनाशी झाली कीं "बरं तर; आतां उद्यां आपली समरांगणांतच भेट !" असा निर्वाणीचा मार्ग पत्करावा लागतो. प्रत्येक युगाला अशाच प्रकारें पाशवी शक्तीचा अंगीकार करावा लागला आहे. सारांश, बुद्धिसामर्थ्याची शेखी मिरवतां मिरवतां पाशवी शक्तीची कास धरायची आणि मग युद्धोत्तर पुनर्घटनेबद्दल विवेचना करायची ! तेव्हां, साकल्यानें पाहूं जातां, सर्व युगंधरांच्या अन्तर्यामीं हेंच पालुपद घोळत असेल कीं—

जमेचि ना, घडेचि ना
कळेचि ना, पटेचि ना

'अगा सुईच्या...परती '—दुसऱ्या महायुद्धाच्या वेळची भाषा ' बिनशर्त शरणागती !' आणि कोरिया-शस्त्रसंधींतील भाषा ' अडतीस अक्षांश रेषा ' हे उद्गार म्हणजे त्या दुर्योधनाच्या उद्गाराच्या नवयुगीन आवृत्त्याच होत.

'चुकाच त्या कीं...पाठी सारे' व्हर्सायच्या तहांतूनच दुसऱ्या जागतिक महायुद्धाचा लोळ उठला, असा इतिहासज्ञांचा अभिप्राय आहे.

**अहो निघाला शिष्टाईला:**—भारतीय महायुद्ध टळावें म्हणून शिष्टाई करण्यासाठीं खुद्द श्रीकृष्ण परमात्म्याची योजना झाली होती, हें सर्वश्रुत आहे. आणखी कोणता महान् पुरुषोत्तम आणायचा होता ?

हें दुसरें जागतिक महायुद्ध टळावें म्हणून ग्रेट ब्रिटनचा त्या वेळचा पंतप्रधान चेंबरलेन ह्यानें केलेल्या शिष्टाईबद्दल इतिहासकारांनीं असें लिहून ठेवलेलें आहे कीं हिटलरबरोबर चेंबरलेनच्या दोन मुलाखती झाल्या होत्या. एक बर्चेस गॅडन येथें; आणि दुसरी गॉड्सबर्ग येथें. "युरोपच्या शान्ततेला धोका येऊं नये, हें महायुद्ध टळावं, म्हणून आणखी एकदां, तिसऱ्यांदा हिटलरच्या भेटीला जाण्याचं मी योजलं असून त्याच्याकडून अनुमति येण्याची मी वाट पाहात आहे" असें चेंबरलेनचें पार्लमेंटमध्यें निवेदन चाललें होतें तोंच,—
in the midst of the session rather too dramatically conceived came the telegram with Hitler's and Mussolini's consent to a joint conference at Munich, the signal for a perhaps unique event in the history of England—The Commons lost its selfcontrol. The members sprang to their feet, shouted and applauded; the galleries were wild with enthusiasm. Not for many years had the dignified House been stirred to such an outbreak of jubilation.

मुलाखत यशस्वी झाली, नेत्यांची परस्परविषयक समजूत पटली, युद्धाची संभाव्यता टळली, अशी जेव्हां बातमी आली तेव्हां The immediate reaction was *universal gratitude to him* (म्हणजे चेंबरलेन) Over the radio came the message 'Peace in our Time', an assurance to our tried generation........*to assist in building a new and better world.*

चेंबरलेन विमानानें परतला. विमान उतरायची नक्की वेळ आगाऊ ठाऊक असती तर सर्व लंडन त्याच्या स्वागतासाठीं विमानतळावर लोटलें असतें.

तथापि, विमानतळावर तो त्या कराराचा कागद हातीं घरून उतरत असतां वेळचा चित्रपट घेण्यांत आला व त्याच दिवशीं सायंकाळीं सर्व चित्रपटगृहांतून तो लगोलग दाखविण्यांत आला. त्या क्षणीं the spectators jumped up from their seats and rejoiced vociferously—They all but embraced one another in the access of fraternity that was about to possess the world. आणि दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांतून त्या विजयी घटनेच्या जयघोषाचे निनाद दुमदुमले. In France there was a proposal to build monument to Chamberlain [ स्टीफान झ्वाइगच्या The World of Yesterday ह्या आत्मचरित्राधारें. ]

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचाहि प्रश्न असाच भिजत कुजत पडला होता. त्याच्या सोडवणुकीचा एक मार्ग म्हणून, हिंदी राजकारणांतील अत्यंत थोर पुरुष ' महात्मा ' गांधी हे बॅ. जिना ह्यांच्या मुलाखतीला, त्यांची समजूत काढायला मुंबईस धावून आले होते. ही अगदीं अलीकडची शिष्टाई देखील ह्या ठिकाणीं जमेस धरली आहे.

ह्या महाभागांना ' अवतारी ' म्हणूनच संबोधण्यांत येतें.

ताजमहाल—हें सुनीत ' भावमंथन ' मधील आहे.

विहिरीचें गाणें—१ : नदी नसलेल्या गांवीं पाणोठ्याचा सर्व कार्यभाग एखाद्या प्रशस्त विहिरीकडे येतो. अशा प्रकारची, निळीनें–पृष्ठभागावर तरंगणाऱ्या रेणुमय शैवालानें आच्छादलेली विहीर सूर्योदयीं हें आशागीत गात आहे.

विहिरीचें गाणें—२ : व्यवहारी जनतेची ये–जा थांबल्यावर अस्तमानीं तीच विहीर हे निःश्वास सोडीत आहे.

तीर्थांस आवाहन : ' काव्यकिरीट ' काव्यांतील हा उतारा आहे. भारतांतील मोठमोठ्या तीर्थवाहिन्यांचें पाणी समारंभपूर्वक यथाविधि यथासोपस्कार आणवून त्या तीर्थोदकांनीं राजाला अभिषेक करण्यांत आला होता.

विश्वामित्री—बडोदें शहरांतून वाहत जाणारी नदी.

वितस्ता ( स्वर्धुनी ):—झेलम नदी.

" आत्मविसर्जन...—दरी " ( कडवें ३ )—झेलमची सौन्दर्य-सम्पन्न दरी पाहून, ' इथेंच आत्मविसर्जन करावें ' अशी अकबर बादशहाला भूल पडली.

" तुझ्याच गेहीं तुला वाहते " आणि " तुमचीच वडीलकी " ( कडवें ६ ) —नर्मदा, तापी, मही, साबरमती, मिन्दोल, अम्बिका, धातूर, पूर्णा ह्या नद्या बडोदें राज्यांतून वाहणाऱ्या आणि ह्या सगळ्या विश्वामित्रीच्या मानानें मोठ्या आहेत.

" सखे सरस्वति.........( कडवें ७ )—ही नदी अन्तः-स्रोता आहे पण ती गुप्तपणानें बडोद्यांतच वाहत आहे अशी कल्पना केली आहे. श्री० सयाजीराव महाराजांच्या कारकीर्दीत विद्येची अतिशय वृद्धि झाली, हा अर्थ ह्या कडव्यांत अभिप्रेत आहे.

आचार्य कालेलकर ह्यांचें " लोकमाता " हें पुस्तक ज्यांनीं वाचलें असेल त्यांना ह्या आवाहनांतील सन्दर्भ सहज समजतील.

**माण्डवी**—चाफळ खोऱ्यांतील माण्ड नदी श्रीसमर्थ-काळीं ' माण्डवी ' ह्या नांवानें उल्लेखिली जात असे, असें कागदपत्रांवरून दिसतें.

**मातेस**—जनतेच्या अभिरुचीप्रमाणें जोंपावेतों लेखक लिहीत असतो तोंपर्यंत जनता त्याचा गौरव करीत असते; त्याला डोक्यावर घेऊन नाचत असते. पण तिच्या अभिरुचीच्या मर्यादा ओलांडल्या गेल्या कीं तीच जनता त्याची निर्भर्त्सना करते, त्याला पायातळीं गाडूं पाहते, भर चव्हाट्यावर त्याच्या कृतीची किंवा आकृतीची चिता रचते. खरें पाहूं जातां, आपल्या एका कृतीचें कौतुक करणारी जनता, आपल्या नवीन कृतीचाहि सहानुभूतिपूर्वक स्वीकार करील अशी, इमानानें परिश्रमपूर्वक कार्य करणाराची अपेक्षा असते. आणि रसिक जनतेनें आपल्या आवडीनिवडीच्या सङ्कुचित चष्म्यांतून न पाहतां लेखकाच्या भूमिकेशीं समरस होऊन, लेखकाच्या पातळीवर येऊन, निर्लेप मनानेंच त्याच्या कृतीचा विचार करावा—आस्वाद घ्यावा—असें

शास्त्रहि साङ्गतें. परन्तु बरेच वेळां अनुभव विपरीत येतो व तोच ह्या कवितेच्या मुळाशीं आहे.

**मायभूमीस अखेरचें वंदन**---हा उतारा 'बन्दीशाळा' ह्या खण्डकाव्यांतील आहे.

रिफॉर्मेटरी स्कूल ही बालगुन्हेगारांना सुधारण्याची शाळा. 'शाळा' हें तिचें नांव व स्वरूप असलें तरी, व्यवहारांत ती बालगुन्हेगारांची बन्दीशाळाच होय. ह्या बन्दीशाळेंतून सुटून आलेला कैदी—आरंभींचा बाल कैदी—आतां सज्ञान झालेला असतो. सुटकेच्या वेळीं, पश्चात्तापानें, इमानें—इतबारें वागून सभ्य नागरिक होण्याची तो आकांक्षा बाळगतो. पण सुटून आलेल्या कैद्याला कोणीहि सहानुभूतीनें जवळ करायला धजत नाहीं. जो तो त्याच्याकडे साशंक नजरेनेंच पाहात असतो. त्याचा कुठेंहि जमिनीला पाय लागत नाहीं.

प्रस्तुत काव्यांतील नायक अशा स्थितींत अखेर वैतागून महायुद्धाच्या वेळच्या रिक्रूट भरतींत जातो. यथाकाल त्याची पलटण आगबोटींतून युरोपच्या रणभूमीवर आघाडीला दाखल होण्यासाठीं निघाली असतांना, मायभूमीचा किनारा सोडतांना त्याच्या मनांत जे भाव उचंबळून आले ते ह्या गीतांत गोंवले आहेत.

**द्या आम्हाला सुळीः**—सतीचें वाण घेतलेल्या देशभक्तांची फाशीं जातां वेळची मनःस्थिति.

# जातींचे नामोल्लेख

प्रस्तुत संग्रहांतील बहुतेक कवितांच्या वृत्त—जाति—छंदांचे नामोल्लेख माधवराव पटवर्धन ह्यांच्या ‘ छन्दोरचना ’ ह्या ग्रंथाधारें केले आहेत. पण ‘ छन्दोरचनेच्या ’ पहिल्या ( १९२७ च्या ) आवृत्तीमधील कांहीं नांवें पुढें सुधारून वाढविलेल्या ( १९३७ च्या ) आवृत्तींत बदललेलीं आढळतात. उदाहरणार्थः—

| कविता | पृष्ठ | पहिलें नांव | नवीन नांव |
|---|---|---|---|
| प्रतीक्षा | ३ | जाति नवती | जाति जीवितेश्वरी |
| कुरकुर | ६ | ,, शूर्पणखा | ,, घनराई |
| झाल्या तिन्हिसाञ्जा | ११ | ,, अवनी | ,, परिलीना |
| गुलामाचें गाऱ्हाणें | २० | वृत्त श्यामला | वृत्त मन्दाकिनी |

ह्या नामान्तराची कल्पना आधीं न आल्यामुळें, प्रस्तुत संग्रहांत वरील कवितांचे छन्दप्रकार पूर्वीच्या नांवानेंच नमूद झाले आहेत.

“ आईचें मन ” (पृ. ८) ह्या कवितेच्या ओंवी छन्दाला ‘ देवीवर ’ असें नांव देण्यांत आलें आहे, हेंहि ध्यानीं घ्यायला पाहिजे.

थोड्याशा फरकानें नामान्तर कसें करण्यांत आलें आहे ह्याचें थोडेसें विवेचन इथें अनवश्यक होणार नाहीं. “ प्रतीक्षा ’ कवितेचीं कडवींः—

दार वाजलें
उठुनि धावलें
पाहिलें परन्तु कोणि नाहिं पातलें

अशा मापाचीं आहेत. ह्यापैकीं ‘ उठुनि धावलें ’ हा चरण कमी केला तर, चाल कायम राहूनहि, ‘ छन्दोरचने’च्या उपरोक्त नव्या आवृत्तीप्रमाणें कवितेला ‘ हृदयमोहना ’ जातींत ढकलावें लागलें असतें. चाल कायम राहूनहि थोड्याशा सूक्ष्म फरकानें जाति अशी बदलण्यांत आली आहे. ह्याचें दुसरें उदाहरण म्हणजे “ नौकाविहार ” ह्या कवितेचें. ‘ कुरकुर ’ च्या जातीचीच

ही वाटेल; पण छन्दोरचनेच्या नव्या आवृत्तीप्रमाणें हिनें 'भरतखण्ड' जातीचा सवता सुभा थाटलेला आढळतो.

हें ध्यानीं घेऊन, बाकीच्या कवितांच्या जाति नवीन आवृत्तींतील नांवांनीं नमूद करण्याची शक्य तों दक्षता घेतली आहे. मात्र "बालमुकुन्द" ह्या नांवानें जी जाति नवीन आवृत्तींत विवेचिली आहे त्या जातीची "मातृपदाविण" ही कविता नसल्याबद्दल स्पष्ट उल्लेख तिथें करण्यांत आला आहे. कारण, प्रत्येक कडव्याचा चौथा चरण ध्रुपदाच्या दुसऱ्या चरणाच्या मात्रावलीचा नसल्यामुळें ह्या कवितेची जाति "बालमुकुन्द" ठरत नाहीं. पण मग दुसऱ्या कोणत्या नांवानें ह्या कवितेच्या जातीचा उल्लेख करावा हें न आढळल्यामुळें प्रस्तुत संग्रहांत "बालमुकुन्द" ह्याच नांवाचा अंगीकार करण्यांत आला आहे.

'नसे जग सर्वस्वीं अनुदार' आणि 'अन्य नको वरदान' ह्या कवितांच्या जातींचा उल्लेख कोणत्या नांवानें करावा हाहि प्रश्न पडल्यामुळें मथळ्यांत उल्लेख केला नाहीं. 'छन्दोरचना'–१९३७ च्या आवृत्तीप्रमाणें ह्या कवितांची जाति 'कलकल' होईल असें वाटतें. 'वाटतें' म्हणण्याचें कारण, मतभेदाला इथेंहि वाव आहे. 'चन्द्रकान्त' जातीशीं ह्या कवितांचें नातें आहे असेंहि म्हणतां येईल, किंवा 'अञ्जनी' जातीशींहि लागाबांधा दाखवतां येईल.

असेंच आणखी एक उदाहरण द्यायचें म्हणजे 'प्रणयप्रभा' जातीचें. नव्या आवृत्तींत प्रणयप्रभा हें नांवच आढळत नाहीं. त्या जातीनें पूर्वी ओळखल्या जाणाऱ्या कविता आतां 'नववधू' व 'श्यामाराणी' ह्या दोन जातींत विभागल्या गेल्या आहेत. जिथें कडव्यांतील तिसरा व चौथा चरण मिळून 'श्यामाराणी' मात्रावलि सिद्ध होते, तिथें ती प्रणयप्रभा आतां 'श्यामाराणी' जातीची बनली आहे ( उदा०–'सत्य न मरते दळभारें ) आणि तद्विरहित प्रणयप्रभा 'नववधू' ठरली आहे ( उदा०—'मातेस' आणि 'फडकते तुझें तेथेंच निशाण').

' तीर्थास आवाहन ' हें संमिश्र स्वरूपाचें असल्यामुळें मथळ्यांत जातीचा नामोल्लेख करतां आला नाहीं.

पहिला व तिसरा चरण ' समुदितमदना ' जातीचा

दुसरा चरण समुदितमदना—मात्रावलीपैकीं पहिल्या अकरा मात्रा वगळून उरलेल्या मापाचा

आणि अंतरा उद्धव जातीचा

अशा घडणावळीचें हें काव्य आहे. ह्या घडणावळीच्या जातीला पृथक् नांव दिलेलें आढळत नाहीं. अंतरा उद्धव जातीचा असला तरी प्रस्तुत काव्य म्हणण्याच्या धाटणीला, उद्धव—चरणान्तींच्या चार मात्रा दोन गुरु अक्षरांच्या पाहिजेत, दोन लघु व एक गुरु अशा इथें चालूं शकणार नाहींत.

' स्वातन्त्र्यलक्ष्मीस मुजरा , ह्या कवितेचें वृत्त ' वियद्‌गङ्गा ' असल्यामुळें मुजरा, गजरा, नजरा ' ह्या शब्दांच्या जागीं वृत्तदोष अपरिहार्यपणें उद्‌भवला आहे.

' सरितेचें चरित ' ह्या कवितेच्या जातीचा निर्देश करतां आला नाहीं. मात्र अंतरा पादाकुलकाचा आहे.

• • •

